देवकृत

# तानुभव.





मुंबईत

छापखान्यांत ना. वा. गुमरे यांनीं

छापून [illegible] केला.



सन १८८८.

किंमत ४ आणे.

श्रीज्ञा.१२५.
ल्याणाकृत अमृत
पिका नांवाची औषध

---

विक्रीस त[illegible]

वाग्भट, सटीक—किंमत

स्त्रीरोगविज्ञान—किंमत

श्री रामदासकृत [illegible]

---

## अति स्वस्त इंग्रजी आणि मराठी कोश

प्रत्येक इंग्रजी शब्दाचे अनेक इंग्रजी व मराठी अर्थ दर्शविणारा. किंमत—बांधलेल्या प्रतीस १॥ रु., बिन बांधलेल्या प्रतीस १ रु. १७,००० वर शब्द. १,०९९ पृष्ठें.

---

मनांतील प्रश्न त्वरित सांगतां येणाऱ्या

## विलक्षण गंजिफा.

इंग्रजी, मराठी व गुजराथी प्रती. किंमत दर प्रतीस ४ आणे.

वरील सर्व पुस्तकें मुंबईत नं. ३२२ गिरगांव ब्याक रोड एथें "ज्ञानमित्र" छापखान्यांत विकत मिळतील.

# ॥ श्रीज्ञानदेवकृत अमृतानुभव ॥

श्रीगणेशाय नमः ॥ यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययम ॥ श्रीमन्निवृत्तिनाथेतिख्यातंदैवतमाश्रये ॥ १ ॥ गुरुरित्याख्यया लोकेमाक्षाद्विद्याहिशांकरी ॥ जयत्याज्ञानमस्तस्मैदयार्द्रायैर्निरंतरं ॥ २ ॥ मार्द्धकेनचकस्यार्द्ध शिवयोः समरूपिणो ॥ ज्ञातुंनशक्यतेलग्नमितिद्वंनछलान्मुहुः ॥ ३ ॥ अद्वैतमात्मनस्तत्वदर्शयंतौमिथस्तरां ॥ तौवंदे जगतामाद्यौतयोस्तत्वाभिपत्तये ॥ ४ ॥ मूलायाग्रायमध्यायमूलमध्याग्रमूर्तये ॥ क्षीणाग्रमूलमध्यायनमः पूर्णायशंभवे ॥ ५ ॥

ॐनमोभगवतेसदाशिवाय ॥ ॥ऐसीं इयें निरुपाधिकें ॥ जगाचीं जिये जनकें ॥ ते वांदिलीं मियां मूळिकें ॥ देवोदेवी ॥ १ ॥ जो प्रियु चि प्राणेश्वरी ॥ उलथे आवडीचे सरोभरी ॥ चारुस्थळीं एकाहारी ॥ एकांगाचा ॥ २ ॥ आवडीचेनि वेगें ॥ एकएकातें गिळिताहे आंगे ॥ कीं द्वैताचेनि पांगें पळितें अहानी ॥ ३ ॥ जें एकचि नव्हे एकसरें ॥ दोघा ंनिपण नाहिं पुरें ॥ काय नेणो साकारें ॥ स्वरूपें जियें ॥ कैसी स्वसुखाची आळुकी ॥ जें दोनिपण मिळोनि एक. ॥ नेदतीची कौतुकी ॥ एकपण फुटों ॥ ५ ॥ हा ठावोवरि वियोग भिडें ॥ जें बाळक जगा येवढें ॥ विचारी परी न मोडे ॥ दोघलेपण ॥ ६ ॥ आपुलिये आंगीं सं-

सागर ॥ देखिलिया चराचर ॥ परि नेदिती च निमग ॥ झोंक लागों ॥ ७ ॥ जया एकें सत्तेचें वेमणें ॥ दोघां एका प्रकाशाचें लेणें ॥ जें अनादि एकपणें ॥ नांदती दोघें ॥ ८ ॥ भेदु त्याजोनि आवडी ॥ एकरसी देत बुडी ॥ तो भोगणेंया थावकाढी ॥ अद्वैताचा जेथें ॥ ९ ॥ जेणें देवें संपूर्ण देवी ॥ जियेवीण कांहीं ना तो गोसावी ॥ किंबहुना एकोपजीवी ॥ एकाएकाची ॥ १० ॥ कैसा मेळु आला गोडिये ॥ दोघें न माती जगीं इयें ॥ कीं परमाणूहि माजी उराये ॥ मांडिती अहाती ॥ ११ ॥ जिहीं एकएकावीण ॥ न कीजे तृणाचेंही निर्माण ॥ जियें दोघें जीवप्राण ॥ जिया दोघां ॥ १२ ॥ वरवातें मोटकी दोघें ॥ जे गोसावी सेज रिघे ॥ तें दंपत्यपणें जागे ॥ स्वामिणि जे ॥ १३ ॥ जया दोघांमाजि एकाधें ॥ विपायें उमजलें होय निदें ॥ तरी घरवात गिळूनि नुसधें ॥ काहीं ना करी ॥ १४ ॥ दोहीं आंगाचीं आटणी ॥ गिवसीत अहाती एकपणीं ॥ जाली भेदाचिया वाहणी ॥ अधाधी जियें ॥ १५ ॥ विषो एकएकाचा जियें ॥ एकमेकाचीं विषयीं जायें ॥ जिहीं दोघीं मुनियें ॥ जियें दोघें ॥ १६ ॥ स्त्री पुरुष नाम भेदें ॥ शिवपण एकलें नांदे ॥ जग सकळें अधार्धे ॥ पणें जियें ॥ १७ ॥ दो-दांडी एकश्रुती ॥ दोहीं फुलीं एक वृत्ती ॥ दोहीं दिवीं दीप्ती ॥ एकीचि जेवी ॥ १८ ॥ दो वोठीं एक गोष्टी ॥ दो डोळां एकी दृष्टी ॥ तेवीं दोघीं जिहीं सृष्टी ॥ एकी-चि जेवी ॥ १९ ॥ दाऊनि दोनिपण ॥ एक रसाचें आरोगण ॥ करीत आहे मेहुण ॥ अनादि जे ॥ २० ॥ जे स्वामिचिया सत्ता ॥ विण असो नेणें पतिव्रता ॥ जि-

ये वीण सर्व कर्ता ॥ कांहीं ना जो ॥ २१ ॥ जे कीं
भातारेचें दिसणें ॥ भातारुचि जियेचें असणें ॥ नेणि
जति दोघे जण ॥ निवडूं जिये ॥ २२ ॥ गोडी आणि
गुळु ॥ कापुर आणि परिमळु ॥ निवडूं जातां पांगळु ॥
निवाडु होये ॥ २३ ॥ समग्र दीप्ति घेतां ॥ जेवि दिपचि
ये हाता ॥ तेवि जियेचिया तत्त्वता ॥ शिवुचि लाभे ॥ २४ ॥ जैसा
सूर्य मिरवे प्रभा ॥ प्रभे सूर्यत्वचि गाभा ॥ तैसी भेद गि-
ळित शोभा ॥ एकचि जे ॥ २५ ॥ कां बिंब प्रतिबिंबा द्यो-
तक ॥ प्रतिबिंब बिंबा अनुमापक ॥ तैसें द्वैतमिसें एक ॥ बरव-
तसे ॥ २६ ॥ सर्व शून्याचा निष्कर्षु ॥ जिया बाइला केला पु-
रुषु ॥ जेणें दादुलेन सत्ता विशेषु ॥ शक्ति जालि ॥ २७ ॥
जिये प्राणेश्वरीवीण ॥ शिवींहि शिवपण ॥ थारों न शके
तें आपण ॥ शिवें घडिली ॥ २८ ॥ ऐश्वर्येशीं ईश्वरा ॥
जियेचें आंग संसारा ॥ आपुला होउनि उभारा ॥ आ-
पणचि जे ॥ २९ ॥ पतिचेनि आरूपपणें ॥ लाजोनि
आंगाचें मिरविणें ॥ केलें जगा एवढें लेणें ॥ नामरू-
पाचें ॥ ३० ॥ एकयाचाही दुकाळा ॥ बहुपणाचा सोह-
ळा ॥ जिया सर्देवेंचिया लीळा ॥ दाखविला ॥ ३१ ॥
आंगाचिया आटणिया ॥ कांतु उवाया आणिला जिया ॥
स्वसंकोचें प्रिया ॥ रूढविली जेणें ॥ ३२ ॥ जियें तें
पाहावयाचिया लोभा ॥ चंद्र द्रष्टत्वाचिया क्षोभा ॥ ज-
येनें न देखतुचि उभा ॥ आंगचि सांडी ॥ ३३ ॥ कां-
तचिया भिडा ॥ आवल्या होय जगा एवढा ॥ आंगविला
उघडा ॥ जियेविण ॥ ३४ ॥ जो हा ठाव मंदरूपें ॥
उवाइलेपणं हारपे ॥ तो जाला जिणेचेनि पडपें ॥ विश्व
रूप ॥ ३५ ॥ जिया चेविला शिवु ॥ वेद्याचें बोणें बहु ॥

वाढितेनमिसें जेउं ॥ नियालों जो ॥ ३६ ॥ निद्रलें न भातारें ॥ जें विश्व चराचरें ॥ जियेचा विसवल्ला नेणें ॥ आवुलेपण ही ॥ ३७ ॥ जेंव कांत लपों वैसे ॥ तव नेणिजे जियोद्देशें ॥ जिये दोघें आरिसें ॥ जिये दोघां ॥ ३८ ॥ जियेचेनि आंगलगें ॥ आनंद आपणा आंगगृ लागे ॥ सर्व भोक्तत्वही नेघे ॥ जियेविण कांहीं ॥ ३९ ॥ जया प्रियाचें जें आंग ॥ जो प्रिय जियेचें चांग ॥ काल्उनी दोन्ही भाग ॥ जेवीत अहाती ॥ ४० ॥ जैसी कां समीरें सकट गती ॥ का सोनियांसकट कांती ॥ तैसी शिवेंसी शक्ती ॥ आघवीचि जे ॥ ४१ ॥ कां कस्तुरिसकट परिसळु ॥ का उष्मसकट अनळु ॥ तैसा शक्तीसि केवळु ॥ श्रीशिवुचि जो ॥ ४२ ॥ ना राति आणि दिवो ॥ पातली सर्याचा ठावो ॥ तैसा आपुला सांचिवावो ॥ दोघे जिये ॥ ४३ ॥ किंबहुना येथें ॥ प्रणवाक्षरी विरूढतिये ॥ दर्शनिंहीं वेगिये ॥ शिवशक्ति ॥ ४४ ॥ हें असो नामरूपाचा भेदसिग ॥ गिळित येकार्थाचा उजिरा ॥ नमो तयां शिवगौरा ॥ ज्ञानदेवो ह्मणे ॥ ४५ ॥ जयाचा रूप निर्धारी ॥ गेली परेसी वैखरी ॥ सिंधुसी प्रळय निरीं ॥ गंगा जैसी ॥ ४६ ॥ जया दोघांचा आळिंगनीं ॥ विरोनि गेली दोन्ही ॥ अवघीयाची रजनी ॥ दिठिचि जे ॥ ४७ ॥ नातरी वायु चळवळेसि ॥ निराला व्योमाचिये कुसीं ॥ हारपला प्रळय प्रकासीं ॥ सप्रभ भानु ॥ ४८ ॥ तेवि नेहाळितां ययातें ॥ गेले पाहणेंनासि पराते ॥ पुढति घरोते वरौते ॥ वंदिलि तियें ॥ ४९ ॥ जयाचा वाहाणि ॥ वेदकु वेद्याचें पाणी ॥ न पिये पण सांडणी ॥ आंगाचीही करी ॥ ५० ॥ तेथें मी नमस्का-

गां ॥ लागीं उरों दूसरा॥तरी लिंगभेद पर्‍हां॥ जोडु जाणें ॥ ५१ ॥ परी मानिनलों दुजें ॥ नव्हतु म्हणें सोना भजें ॥ हें नमन करणें माझें ॥ तैसें आहे ॥५२॥ मांगतां वाचेनें वाचा ॥ ठावो वाच्य वाचकाचा ॥ पडतां काय भेदाचा ॥ विटाळ होय ॥ ५३ ॥ सिंधु आणि गंगेचि मिळणी ॥ क्षारकृप नामाची मिरवणी ॥ दिसतसे तरी काय पाणी ॥ दुजें होईल ॥ ५४ ॥ पाहे पां भास्यभासकता ॥ आपुला ठाईं दाविता ॥ एकपण काय सविता ॥ मोडीतसे ॥ ५५ ॥ चांदाचिया दोंदावरी ॥ होतां चांदणियाचि विखुरी ॥ काय उणें दीप्तिवरी शिवसीं पा दिसु ॥ ५६ ॥ मोतियाचि कीळ ॥ होय मोतियावरी पांगुळ ॥ आगळें निर्मळ ॥ रूपा ये कीं ॥५७॥ मात्राचिया त्रिपुटिया ॥ प्रणव काय केला चिरटिया ॥ किं णकार निहेरघटिया ॥ भेदला काई ॥ ५८ ॥ अहा ऐक्याचें मुद्दल न ढळे ॥ आणि मार्जिरपणाचा लाभ मिळे ॥ तरि स्वतरंगाचि मकुळें ॥ तुरंबूं कां पाणी ॥ ५९ ॥ म्हणौनि भूतेशु आणि भवानी ॥ वंदिलीं न करुनि सिनानि ॥ मीं निजालों नमनीं ॥ तें हें ऐसें ॥ ६० ॥ दर्पणाचेनि त्यागें ॥ प्रतिबिंब बिंबीं रिघे ॥ कां वृद्धी दिजे तरंगे ॥ वायूचा ठेवा ॥ ६१ ॥ नातरी निद जातखेवो ॥ पावे आपुला ठावो ॥ तैसि बुद्धित्यागें देविदेवो ॥ वंदिली मीयां ॥ ६२ ॥ मोडूनि मिळपणाचा लोभु ॥ मिळे सिंधुत्वाचा वेतला लाभु ॥ देवि अहं देउनी शंभु ॥ शांभवी जालें ॥ ६३ ॥ शिवशक्तिसमावेशें ॥ नमन केलें म्यां ऐसें ॥ रंभागर्भ आकाशें ॥ रिघाला जैसा ॥ ६४ ॥

इतिश्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते शिवशक्तिसमावेश नमनंनामप्रथमप्रकरणं संपूर्णम् ॥ १ ॥

---

## प्रकरण २.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां उपायवनवसंतु ॥ जो आज्ञेचा आहेवतंतु ॥ अमूर्तचि परि मूर्तु ॥ कारुण्याचा ॥ १ ॥ मोडोनि माया कुंजरु ॥ मुक्तमोतियांचे वोगरु ॥ जेवविता सद्गुरु ॥ श्री निवृत्ति वंदु ॥ २ ॥ आ विद्येचें आडवें ॥ भंजित जीवपणाचें भवें ॥ तया चैतन्याचें धांवें ॥ धांवकारु जो ॥ ३ ॥ जयाचेनि अपांगपातें ॥ बद्ध मोक्षपाणि आतें ॥ भेटे जाणतया जाणतें ॥ जयापासीं ॥ ४ ॥ कैवल्यकनकाचिया दाना ॥ जो वें कडसी थोरपणा ॥ द्रष्टयाचिया दर्शना ॥ पाटाउ जो न ॥ ५ ॥ सामर्थ्याचेनि बिकें ॥ जो शिवातें हि गुरुत्व ॥ जिंकें ॥ आत्मा आत्मसुख देखे ॥ आरिसां जिये ॥ ६ ॥ बोध चंद्राचिया कळा ॥ विसुरलिया एक वेळां ॥ कृपा पुनीवलीळा ॥ करी जयाचि ॥ ७ ॥ जो भेटलियाचि सवें ॥ पुरती उपायाचे धांवें ॥ प्रवृत्तिगंगा थिरावें ॥ सागरीं जिये ॥ ८ ॥ जयाचेनि अनवसरें ॥ द्रष्टा ले दृश्याचें मोहिरे ॥ जो भेटतखेव मरे ॥ बहुरूपचि हें ॥ ९ ॥ अविद्येचे काळवखें ॥ कीं स्वबोधसूर्दिनें फांके ॥ सीतलें प्रसादार्कें ॥ जयाचेनि ॥ १० ॥ जयाचेनि कृपासलीलें ॥ जिवु हा ठाववरी पाखाळें ॥ जें शिवपण हि वोविळें ॥ आंगीं न लवी ॥ ११ ॥ राखों जातां शिष्यातें ॥ गुरुपणाहि धाडिलें थितें ॥ तऱ्हीं गुरुगौरव जयातें ॥ मांडिचिना ॥ १२ ॥ एकपण नव्हे सुसास ॥ ह्मणोनि गुरु

शिष्याचें करूनि मिस ॥ पाहणेंचि आपुली वास ॥ पाहातचि असे ॥ १३ ॥ जयाचेनि कृपातुषारें ॥ परतले अविद्येचें मोहिरें ॥ परिणमे अपारें ॥ बोधांमृत ॥ १४ ॥ वेद्या वेदतां मिठि ॥ वेदकु हा सुये पोटीं ॥ तऱ्ही नव्हेचि उमिठि ॥ दिठी जयाची ॥ १५ ॥ जयाचेनि मावायें ॥ जीवु ब्रह्म उपर लाहे ॥ ब्रह्म तणानळीं जायें ॥ उदासें जेणें ॥ १६ ॥ उपाधिथवरी गवसिया ॥ उपाय फळ येती मोडोनियां ॥ वरी वडिलिया जयाचिया ॥ अनुज्ञा कां ॥ १७ ॥ जयाचा दिठिवा वसंतु ॥ जंव न रिघे निगमवनाआंतु ॥ तव आपुलिये फळीं हातु ॥ नेघेपर्ती हीं ॥ १८ ॥ पैं दृष्टीचेनि अलगें ॥ सोचि की निवटि मागें ॥ येवडें या जैना नेत्र ॥ आपण पै जो ॥ १९ ॥ लघुत्वाचेनि मदें ॥ वैसल्या गुरुत्वाचे मेळें ॥ नासूनि नाथिलें ॥ मदैव जो ॥ २० ॥ नाहीं तें जळीं बुडिजे ॥ तें भनवटें जेणें तरिजे ॥ जेणें तरिलियांहीं तरिजे ॥ कवणा ठाईं ॥ २१ ॥ आकाश हें मावेव ॥ न वंचे आवकाशाची हाव ॥ ऐसें कोणी एक भरीव ॥ चिदाकाश जें ॥ २२ ॥ चंद्रादि सुशीतळें ॥ वडलीं जयाचेनि मेळें ॥ सूर्य जयाचेनि उजाळें ॥ कडवसेनी ॥ २३ ॥ जीवपणाचेनि त्रासें ॥ यावया आपुलिये देशीं ॥ तो शिवही म्हणे पुसे ॥ जया जोशियातें ॥ २४ ॥ चांदिणें स्वप्रकाशाचें ॥ लेइला हेनदुणीचें ॥ तऱ्हीं उघडेपण न वचे ॥ चांदाचें जया ॥ २५ ॥ जो उघडकीं न दिसे ॥ प्रकाशकीं न प्रकाशे ॥ असतेपणेंचि नसे ॥ कव्हणीकडे ॥ २६ ॥ आतां जो तो इहीं शब्दीं ॥ कैं मेळउ अनुमानाचि मादी ॥ हा प्रमाणा येवों नेंदि ॥

कोण्हाही साकाई ॥ २७ ॥ जेथें शब्दाची लिही पुसे॥ तेणेंसी चावळों बैसे ॥ दुजायाचा रागी रुसे ॥ एकपणा नो ॥ २८ ॥ प्रामाणाचि परि सरें ॥ तैं प्रमेयेची अविष्करें ॥ नवल मेचु इये भुरें ॥ नाहींपणाची ॥ २९ ॥ कांहींबाही अळुमाळु ॥ देख एस्वादे वेळु ॥ तरि देखे तेंही विटाळु ॥ जया गांवा ॥ ३० ॥ तेथें नमनें कां बोलें ॥ केउती मुखें पाउलें ॥ आंगीं लाउनी नाडिलें ॥ नावंचि येणें ॥ ३१ ॥ नव्हे आत्मया आत्मप्रवृत्ति ॥ वाइविनां कें निवृत्ती ॥ या नामाचि वाय वृथी ॥ सांडेचि ना ॥ ३२ ॥ निवृत्य तवं नाहीं ॥ मा निवर्तवी हा काई ॥ तरी कैसा बैसे ठाई ॥ निवृत्ति नामाचा ॥ ३३ ॥ परी सूर्यासी अंधकारु ॥ कें जाला होता गोचरु ॥ तऱ्हीं तमारि हा डगरु ॥ आलाचि कीं ॥३४॥ तैसें लटिकें येणें रुढे ॥ जड येणें उजिवडे ॥ न घडे तेंही घडे ॥ याचिया भावा ॥३५॥ हां गा माया वशें दाविसी ॥ तं माईक ह्मणोन वाळिसी ॥ अमाईक तंव नव्हसी ॥ कवणाही विषयो ॥ ३६ ॥ शिवशिवा सद्गुरु ॥ तुजला गुंडा काय करूं ॥ एकची निर्धार धरूं ॥ देतासिकां ॥ ३७ ॥ नामें रूपें बहुवसे ॥ उभारूनि पाडिलीं वोसें ॥ सत्तेचेनि आवेशें ॥ तोषलासि ना ॥३८॥ जीउ घेतलीया उणें ॥ चालों ने दीसी माजणें ॥ भृत्य उरे स्वामीपणें ॥ तेंही नव्हे ॥ ३९ ॥ विशेषाचेनि नांवें ॥ आत्मत्वही न साहावें ॥ किंबहुना न व्हावें ॥ कोण्हीच यया ॥ ४० ॥ राति नुरे सूर्या ॥ ना तरी लवण पाणियां ॥ नुरें जेंवि चेईलेयां ॥ नीद जैसी ॥४१॥ कापुराचे थळीव ॥ नुरवीचि आंगीची बरव ॥ नुरेचि रुप

नांव ॥ तेसें यया ॥४२॥ याच्या ज्ञानापायां पडे ॥ तंव वेद्यत्वें पुढें न मंडे ॥ न पडतांचि हा मिडे ॥ भेदाचिये ॥ ४३ ॥ आपणाप्रती रवी ॥ उदो न करी जेवी ॥ हा वेद्य नव्हे तेवी ॥ वेदनासी ॥४४॥ कां समोरपण आपुलें ॥ न लाहिजे कांहीं केलें ॥ तेसें वेद्यत्व नाकळे॥हारउनि येणें ॥ ४५ ॥ आकाशाचा आरिसा ॥ उठि प्रतिबिंबाचा ठसा ॥ हा वेद्य नव्हे तैसा ॥ नमस्कारासी ॥ ४६ ॥ परी हा नव्हे तरि नहो ॥ हें बोलणें कां बेवो ॥ परी वेदितया ही ठावो ॥ उरे नेदी ॥ ४७ ॥ आंगानि एकुण आलु ॥ फेडितांचि नारे ना वाहेरिलु ॥ कडु फिटे आंतुलु ॥ न फेडितांचि ॥ ४८ ॥ नाना चित्रपणा सरिसें ॥ येउनि प्रतिबिंब नासे ॥ नेले वेद्यत्व तैसें॥ वेदितेन मी ॥ ४९ ॥ नाहीं रूपाचि जेथें सोय ॥ तेथें दृष्टीचें कांहींच नव्हे ॥ आम्हा फळलें हे पाये ॥ ऐसी या दशा ॥ ५० ॥ गुणा तेलाचिया सोडरीका ॥ निवाही दिप काळिका ॥ ते कां होईल पळिका ॥ कापुराचिया ॥ ५१ ॥ तया दोहीं परस्परें ॥ होय ना जवसेल्हेरें ॥ तेव दोहींचें हे सरे ॥ सर्वस्वीं ॥ ५२ ॥ तेचि देखता मी ययातें ॥ तेव गेलें वेद्य वेदितें ॥ चेइलिया कातें स्वप्नीचि जेवी ॥ ५३ ॥ किंबहुना इया भाषा ॥ द्वैताचा जेथें उपखा ॥ फेडूनियां स्वसरवा ॥ श्रीगुरु वंदिला ॥ ५४ ॥ याच्या सख्याची नवाई ॥ आंगीं एकपणा रूप नाहीं ॥ आणि गुरुशिष्य दुवाल्ही ॥ पवाडु केला ॥ ५५ ॥ तैसा आपणया आपण ॥ दोविण सोइरेपण ॥ हा याहुनि विलक्षण ॥ नाहींचि नोहे ॥५६॥ जग अवघें पोटीं माये ॥ गगना एव्हडें होउनि ठाये ॥

तेंचि कीं सोये माहे ॥ नाहींपणाची ॥ ५७ ॥ कां पूर्ण
तें तरी आधारु ॥ सिंधु जैसा दुर्भरु ॥ जैसा विरुद्धा
पाहुणेरु ॥ याचा घरीं ॥ ५८ ॥ तेजा तमातें कांहीं ॥
परस्परें निकें नाहीं ॥ परी सूर्याचा ठाईं ॥ सूर्येचि असे
॥ ५९ ॥ एक ह्मणतां भेदु ॥ तो कीं नानात्वें नांदे ॥
विरुद्ध आपण यां विरुद्ध ॥ होतील कांई ॥ ६० ॥
ह्मणोनि शिष्य आणि गुरुनाथु ॥ या दोहीं शब्दांचा
अर्थु ॥ श्रीगुरुचि परि होतु ॥ दोहीं ठाईं ॥ ६१ ॥
कां सुवर्ण आणि लेणें ॥ वसतें एकें सुवर्णें ॥ वसतें चंद्र
चांदणें ॥ चंद्रचि जेवि ॥ ६२ ॥ नाना कापुर आणि
परिमळु ॥ कापुरचि केवळु ॥ गोडी आणि गुळु ॥ गुळे-
चि जेवि ॥ ६३ ॥ तैसा गुरुशिष्य मिसें ॥ हाचि येकु
उल्हासें ॥ जरी कांहीं दिसे ॥ दोनिपणें ॥ ६४ ॥ आ-
रिसा आणि मुखीं ॥ मी दिसे हें उखीं ॥ हे आपुलिये
वोळखी ॥ जाणें मुख ॥ ६५ ॥ पाहापां निरंजनीं नि-
देला ॥ तो निर्विवाद एकला ॥ परी चेता चेवविता जाला॥
दोनी तोचि ॥ ६६ ॥ जे तोचि चेता तोचि चेववी ॥
तेंवी हाचि बुझे हा बुझावी ॥ गुरु शिष्यत्व नांदवी ॥
ऐसे न हा ॥ ६७ ॥ दर्पणेंविण डोळा ॥आपुले भेटीचा
सोहळा ॥ भोगितां तरी लीळा ॥ सांगतों हें ॥ ६८॥
एवं द्वैतासि उमसों ॥ नेंदुनि ऐक्यासि विसकुसों ॥ सो-
इरिकेचा अतिसो ॥ पोखितसे ॥ ६९ ॥ निवृति जया
नांव ॥ निवृत्ति जया बरव॥जया निवृत्तिचि राणिव॥नि-
वृत्तिचि ॥ ७० ॥ वाचोनि प्रवृत्ति विरोधें ॥ कां निवृ-
त्तिचेनि बोधें ॥आणिजे तैसा वादें ॥ श्री निवृत्ति नव्हे
॥ ७१ ॥ आपणा देउनि राति ॥ दिवसा आणि उन्न-

त्ति ॥ प्रवृत्ती वागी निवृत्ति ॥ नव्हे तेसा ॥ ७२ ॥ ओपमळेचें वळ ॥ घेउनी मिरवे कीळ ॥ तैसें रत्न नव्हे निर्वाळ ॥ चक्रवर्त्ति हा ॥ ७३ ॥ गगनही मुनि पोटीं ॥ जें चंद्रादि पवळें पृष्टी ॥ तें चांदिणें तेणें उठी ॥ आंग जयाचें ॥ तैसें निवृत्तिपणासि कारण ॥ हाचि आपणया आपण ॥ चेयावया फुलचि जाले घ्राण ॥ आपली दृती ॥ ७५ ॥ दिठि मुखाचिये वरे ॥ पाठीकडूनि जै पावे ॥ तें आरिसे धांडोळावे ॥ लागती काई ॥ ७६ ॥ कीं राती हन गेलीयां ॥ दिवस हन पातलीयां ॥ काय सूर्य-पण सूर्या ॥ होआवें लागे ॥ ७७ ॥ ह्मणोनि बोध्य बो-धानि ॥ वेप प्रमाणं माथोनी ॥ ऐसा नव्हे भरवसोनी ॥ गोसावी हा ॥ ७८ ॥ ऐसा कारणयाविण ॥ स्वयंभचि हें निवृत्तिपण ॥ तयाचे श्री चरण ॥ वंदिले ऐसें ॥ ७९॥ आतां ज्ञानदेवो ह्मणे ॥ श्री गुरुप्रणामे येणें ॥ फेडिली वाचा रुणें ॥ चोहिं वाचाची ॥ ८० ॥ इतिश्री सिद्धानु-वादे श्रीमदनुभवामृते श्रीगुरुस्तवनकथनं नाम द्वितीय प्रकरणं संपूर्णम् ॥ २ ॥

---

## प्रकरण ३.

श्रीगणेशाय नमः ॥ जयाचेनि वोभाटें ॥ आत्मयाची आंप लोटे ॥ पूर्ण तऱ्ही रुण न फीटे ॥ जे चेणेंचि नीद-का ॥ १ ॥ येऱ्हवीं परादिका चौवी ॥ जीव मोक्षाचा उपर्गी ॥ अविद्येसवें आंगीं वेचती कीर ॥ २ ॥ देहा-सवें हातपायें ॥ जाती मनासवें इंद्रियें ॥ कां सूर्यासवें जाये ॥ किरणजाळ ॥३॥ नातरी निद्रेचिये आवधी ॥ स्वप्नें मरती आधीं ॥ तेवीं अविद्येचे संबंधीं ॥ आटती

इया ॥ ४ ॥ मृतें लोहें होती ॥ ते रसरूपें जिति ॥ जळोनि इंधनें येती ॥ वन्हिदशें ॥ ५ ॥ लवण आंगें वीरे ॥ परी स्वादें जळीं उरे ॥ निद्र मगेनि जागरें ॥ जीयेनिद्रें ॥६॥ तेंवि अविद्या सर्वें ॥ चौघी वेचती जिवें ॥ तत्वज्ञानाचेनि नांवें ॥ उठतीचि येया ॥७॥ हा तत्वज्ञान दिवा ॥ मगेनि इहीं लावावा ॥ तरी हाही शिणलेवा ॥ बोध्यरूपेंचि ॥ ८ ॥ येउनि स्वप्न मेळवी ॥ गेलीया आपणपा दावी ॥ दोन्ही दिटी नांदवी ॥ नि॰ जेसी॥९॥ जिती अविद्या एसी ॥ अन्यथा बोधातें गिवसी ॥ तेचि यथा बोधेंसीं ॥ निमाली उठी ॥ १० ॥ परि जिति ना मेली ॥ अविद्या हे नाकळि ॥ बंधमोक्षीं घाली ॥ बां-धोनियां ॥११॥ मोक्षाचि बंधु होय॥ तरी मोक्ष शब्द कां साहे ॥ परी अज्ञान घरी त्राये ॥ वाउगी यांची ॥१२॥ बागुलाचेनि मरणें ॥ तोषावें कीं बाळपणें ॥ येरां तो ना-हीं मा कोणें॥ मृत्यु मानावा ॥१३॥ घटचि नाहींपण ॥ फुटले याचि नागवण ॥ मानीतसे ते जाण ॥ ह्मणों येकीं ॥१४॥ ह्मणोनि बंधचि तंवं वावो ॥ मां मोक्षकें प्रस्तावो ॥ परि मरोनि केला ठावो अविद्या तया॥१५॥ आणि ज्ञानबंधु ऐसें ॥ शिवसूत्राचेनि मिसें ॥ ह्मणितलें असे ॥ सदाशिवें ॥ १६ ॥ आणि वैकुंटीचानि हीं सु-जाणें ॥ ज्ञानापांशि सत्व गुणें ॥ बांधिजे हें निरोपणें॥ बहु केलें ॥ १७ ॥ परी शिवेकां श्रीवल्लभें ॥ बोलिलें येणेंचि लोभें ॥ मानू तें हें लाभें॥ ना बोलताहीं॥१८॥ जें आत्मज्ञान निखळ ॥ तेंही घे ज्ञानाचें बळ ॥ तें सूर्य चिती सबळ ॥ तैसें नोहे ॥ १९ ॥ ज्ञानें श्लाघ्यतु आहे ॥ तैं ज्ञानपण घाडिलें वायें ॥ दिप वांचोनि दिवा

लाहे ॥ तें आंग मळलाचकीं ॥ २० ॥ आपणचि आपणापासीं ॥ नेणतां देशोदेशीं ॥ आपणपें गिवसीं हे कीरु होय ॥ २१ ॥ परी बहुतां कां दिसां ॥ आपणापें आठवलियां ॥ ह्मणे मी ययां ॥ कैसा रिझें ॥ २२ ॥ तैसा ज्ञानरूप आत्मा ॥ ज्ञानेंचि आपुली प्रमा ॥ करितसे सोहंमा ॥ ऐसा वंधु ॥ २३ ॥ जें ज्ञान स्वयें बुडे ॥ ह्मणोनि भागी नावडे ॥ ज्ञानें मोक्ष घडे ॥ तो निमालेनि ॥ २४ ॥ ह्मणोनि परादिका वाचा ॥ तो शृंगारुचौ आंगाचा ॥ एवं अविद्या जीवाचा ॥ जीवत्व त्यागीं ॥ २५ ॥ आंगाचेन इंधनें उहासु ॥ उठोनि ज्ञानाग्नि प्रवेशु ॥ करी तेथें भस्म लेशु ॥ वाचाचा उरे ॥ २६ ॥ जळीं जळावेगळु ॥ कापुर न दिसे अवडळु ॥ परि होऊनि परिमळु ॥ उरे जैंव ॥ २७ ॥ आगीं लाविलिया विभूति ॥ ते परिमाणु उडति ॥ परी पांडुरत्व कांतीं ॥ रहे जैसी ॥ २८ ॥ नावांहळला आंगीं जैसें ॥ पाणी पाणीपणें नसे ॥ तऱ्ही वाल्हामाचेनि मिसें ॥ अर्थीच तें ॥ २९ ॥ नातरी माध्यान्ह काळीं ॥ छाया न दिसे वेगळी ॥ असे पायातळीं ॥ रिगोनियां ॥ ३० ॥ तैसें ग्रासूनि दुसरें ॥ स्वरूपीं स्वरूपाकारें ॥ आपुलेपणें उरे ॥ बोध जो कां ॥ ३१ ॥ ते रुण शेष वाचा इया ॥ न न फेडेत मरोनियां ॥ तें पांयां पडोनि मियां ॥ सोडविलें ॥ ३२ ॥ ह्मणोनि परा पश्यंति ॥ मध्यमा हन भारती ॥ या निस्तरलियां लागती ॥ ज्ञानी अज्ञानीची ॥ ३३ ॥ इतिश्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृत वाचारुणमोचनं नाम तृतीयप्रकरणं संपूर्णम् ॥ ३ ॥

---

## प्रकरण ४.

श्रीगणेशाय नमः ॥ आतां अज्ञानाचेनि मारें ॥ आन अभेदे वावरे ॥ निद मांडोनि जागरें ॥ नांदिजे जेवि ॥ १ ॥ कां दर्पणाचा निघाला ॥ ऐक्य बोधु पहिला ॥ मुख भोगि आपुला ॥ आपणचि ॥ २ ॥ ज्ञान जियातियापरी ॥ जगीं आत्म्यैक्य करी ॥ तिया सुरिया खोंचे सुरी ॥ तैसें जालें ॥ ३ ॥ लावि अंत ठाऊनि कोंपठ ॥ तो साधी आपण या संकट ॥ कां बांधले या थारटे ॥ मोटे माजी ॥ ४ ॥ आगी पोतामाचेनि मिसें॥ आपणपे जाळलें जैसें ॥ ज्ञानाज्ञानें नाशे ॥ तैसें जालें ॥ ५ ॥ अज्ञानाचा टेंका ॥ नसतांही ज्ञान अधिका ॥ फांकें जव उफखा ॥ आपुला पडे ॥ ६ ॥ दशाही ते निमालियां ॥ येणें जे उवायां ॥ ते केवळ नाशावयां ॥ दिपाचे परी ॥ ७ ॥ उठणें कीं पडणें ॥ कचभारा कोण जाणें ॥ कां फांकणें कीं मुकणें ॥ जाउळाचे ॥ ८ ॥ तरंगाचे रुपा येणें ॥ तयाचि नांव निमणें ॥ कां विदूचें उदैजणें ॥ तोचि अस्तु ॥ ९ ॥ तैसें पीऊन अज्ञान ॥ तववरि वाटे ज्ञान ॥ जंव आपुलें निधन ॥ निःशेष साधे ॥ १० ॥ जैसें कल्पांतिचें भरितें ॥ स्थळा जळा दोहींतें ॥ बुडविल्या आरौतें ॥ उरोंचि नेणें ॥ ११ ॥ कीं विश्वाहि वेगळ ॥ वाढे जै सूर्य मंडळ ॥ तै तेजतम निखळ ॥ तेंचि होये ॥ १२ ॥ नाना निद मारुनि ॥ आपणपें हिरोनी ॥ जागणें ठाकें होउनी ॥ जागणेंचि ॥ १३ ॥ तैसें अज्ञान अटोनियां ॥ ज्ञान येते उवाया॥ ज्ञानाज्ञान गिळोनियां ॥ ज्ञानचि होये ॥१४॥ ते व्हेकीं पुनिवा भरें ॥ ना आवसां सरे ॥ तें चंद्रिचि उरे ॥

सतगावी जैसी ॥ १५ ॥ कां तेजांतरे नाटोपे ॥ कोणे तम न सिपे ॥ ते उपमेचे जाऊपें ॥ सूर्यचि होये ॥ १६ ॥ म्हणौनि ज्ञानें उजळें ॥ कां अज्ञानें रुळे ॥ तैसे नव्हे निर्वाळें ॥ ज्ञानमात्र जें ॥ १७ ॥ परि ज्ञानमात्रें निखिळें ॥ तेंचि कीं नयासि कळे ॥ काइ देखिजे बुबुळें ॥ बुबुळा जेवी ॥ १८ ॥ आकाश आपणयां रिघे ॥ काइ आंगीं आपणया लागे ॥ आपुला माथां वळघे ॥ आपण कोण्ही ॥ १९ ॥ दिठी आपणया देखे ॥ स्वाद आपणया चाखे ॥ नादु आपलें आइके ॥ नादपण ॥ ॥ २० ॥ सूर्य सूर्यासि विवळे ॥ कां फळ आपणयां फळे ॥ परिमळु परिमळें ॥ घेपत असे ॥ २१ ॥ तैसें आपणयां आपण ॥ जाणतें नव्हे जाण ॥ म्हणोनि ज्ञानपणें विण ॥ ज्ञानमात्र जें ॥ २२ ॥ आणि ज्ञान ऐसी सोये ॥ ज्ञानपणेंसी जरी आहे ॥ तरी अज्ञान हें नोहे ॥ ज्ञानपणेंचि ॥ २३ ॥ जैसें तेज जें आहे ॥ तें आंधारें कीर नव्हे ॥ मा तेज तऱ्हीं होये ॥ तेजासि काई ॥ २४ ॥ तैसें असणें आणि नसणें ॥ हें नाहीं जया होणें ॥ आतां मिथ्या ऐसें येणें ॥ बोलें गमे ॥ २५ ॥ तरी कांहीं नाहीं सर्वथा ॥ ऐसी जरी व्यवस्था ॥ तरी नाहीं हे प्रथा ॥ कवणासि पां ॥ २६ ॥ शून्यसिद्धांतबोधु ॥ कोण्ही सत्ता होय सिद्धु ॥ नसतां हा अपवादु ॥ वस्तुसि जो ॥ २७ ॥ माल्हवितां दिवे ॥ माल्हवितें जरि माल्हवे ॥ तरि दीपु नाहीं हे फावे ॥ कवणासि पां ॥ २८ ॥ कीं निदेचिनि आलेपणें ॥ निदेलें तें जाय प्राणें ॥ तरि निद भलि हे कोणें ॥ जाणिजेल पां ॥ २९ ॥ घटु घटुपणें भासे ॥ तद्भंगें भंगु अभासे ॥ सर्वथा नाहीं

तें नसे ॥ कोण्हें ह्मणावें ॥ ३० ॥ ह्मणोनि कांहीं नाहींपण ॥ देखता नाहीं आपण ॥ नोहूनि असणें न विणें ॥ असणें जे ॥ ३१ ॥ परि आणिकां कां आपणयां ॥ न पुरे विखो होआवया ॥ ह्मणोनि अ मावया ॥ कारण कीं ॥ ३२ ॥ जो निरंजनीं निदैला ॥ तो आणिकीं नाहीं देखिला ॥ आपुलाही निमाला ॥ आठउ तया ॥ ३३ ॥ परि जिवें नाहीं नोहे ॥ तैसें शुद्ध असणें आहे ॥ हें बोलणें न साहे ॥ असे नाहींचें ॥ ३४ ॥ दिठी आपण यां मुरडे ॥ तैं दिठीपण ही मोडे ॥ नाहीं नोहे कुडें ॥ तें जाणतेंचि तें ॥३५॥ कां काळा राहे काळवखा ॥ तो आपणा ना आणिका ॥ न चोजवे तऱ्हीं आथिका ॥ हां मी चाणें ॥ ३६ ॥ तैसें असणें का नसणें ॥ हें कांहींच न मानूं सवाणें ॥ नसोनि असणें ॥ ठाये ठावो ॥ ३७ ॥ निर्मळपणीं आपुला ॥ आकाशाचा मंचु विराला ॥ तों स्वयें असे पुढीलां ॥ कांहीं ना कीं ॥ ३८ ॥ कां आंगि कीं निर्मळपणीं ॥ हारवाले या पोखरणीं ॥ हें आणिका वांचूनि पाणीं ॥ सगळेंचि आहे ॥ ३९ ॥ आपणा भागु तैसें ॥ असणेंचि जें असे ॥ असे नसे हें ऐसें ॥ सांडुनियां ॥ ४० ॥ निदेचें नाहींपणें ॥ निमाले याही जागेपणें ॥ असि जे कां नेणें ॥ कोण होऊनि जैसें ॥ ४१ ॥ कां भूमि कुंभ ठेविजे ॥ तैं सकुंभता अपजे ॥ तो नेलिया ह्मणिजे ॥ तेणेंविणें ॥ ४२ ॥ परी दोन्ही हे भाग ॥ न सिवती भूमिचें आंग ॥ तेव्हेळीं भूमि तैसें चांग ॥ चोख जें असणें ॥ ४३ ॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनु

भवामृते ज्ञानअभेदकथननाम चतुर्थप्रकरणं संपूर्ण
मस्तु ॥ ४ ॥

---

## प्रकरण ५

श्रीगणेशाय नमः ॥ सत्ता प्रकाश सुख ॥ या तिन्हीं
तिन्हीं उणे लेख ॥ जैसें विषपणेंचि विख ॥ विखा नाहीं
॥ १ ॥ कांति काठिण्य कनक ॥ तिन्ही मिळोनि क
नक एक ॥ द्राव गोडी पियूख ॥ पियूखचि जैसी ॥ २ ॥
उजाळ द्रवी मार्दव ॥ या तिन्हींचि तिन्हीं उणीव ॥ हे
दोनिजे सावेव ॥ कापुरी एकें ॥ ३ ॥ आंग कीर उजा-
ळ ॥ कीं उजाळ तेंचि सबाळ ॥ कीं दोन्हीं ना परिम
ळ ॥ मात्र जें ॥ ४ ॥ एसें एक कापुरपणीं ॥ तिन्हीं
इये तिन्हीं उणीं ॥ इयापरी आटणी ॥ सत्तादिकांची
॥ ५ ॥ येऱ्हवीं सच्चिदानंदभेद ॥ चालिली तिन्हीं
पदें ॥ परि तिन्हीं उणीं आनंदें ॥ केलीं येणें ॥ ६ ॥
सत्तांचि कीं प्रकाशु ॥ प्रकाशुचि सत्ता उल्हासु ॥ हें
न निवडे मिटांशु ॥ अमृत जैसें ॥ ७ ॥ शुक्लपक्षींचे
सोळा ॥ दिवसा वाढती कळा ॥ परी चंद्र मात्र सग-
ळा ॥ चंद्रीं जैसा ॥ ८ ॥ थेंबीं पडतां उदक ॥ थेंबा
घरूं ये लेख ॥ परि पडिला टाईं उदक ॥ वांचूनि आहे
॥ ९ ॥ तैसें असताचि या व्यावृत्ति ॥ सत् ह्मणों आलें
श्रुती ॥ जडाचिया समासी ॥ चिद्रूप एसें ॥ १० ॥ दुः-
खाचेनि सर्व नाशें ॥ उरलें तें सुख एसें ॥ निगदिलें
निश्वासें ॥ प्रभुचेनि ॥ ११ ॥ एसें सदादिप्रतियोगी-
ये ॥ असदादि तिन्हीयें ॥ लोटितां जाली त्रयें ॥ स-
त्तादिकां ॥ १२ ॥ एवं सच्चिदानंदु ॥ आत्मा हा ऐसा

शब्दु ॥ अन्यव्यावृत्ति सिद्धु ॥ परि वाचक नव्हे॥१३॥ सूर्याचेनि प्रकाशें ॥ जे कांहीं जड आभासे ॥ तयातें तोगिवसे ॥ सूर्य काई ॥ १४ ॥ तेंवि जेणें तेजें ॥ वाचेसि वाच्य सुजे ॥ ते वाचा प्रकाशिजे ॥ हें कें आहे ॥ १५ ॥ विषो नाहीं कोण्हाही ॥ जया प्रमेयत्वचि नाहीं ॥ तया स्वप्रकाशा काई ॥ प्रमाण होये ॥१६॥ प्रमेय परिच्छेदें ॥ प्रमाणत्वें नांदे ॥ काइ स्वतः सिद्धें ॥ वस्तुचा ठाईं ॥ १७ ॥ एवं वस्तुशि जाणो जानां ॥ जाणणेंचि वस्तु तत्वतां ॥ मग जाणते आणि जाणतां ॥ कैंचा उरे ॥ १८ ॥ ह्मणोनि सच्चित्सुख ॥ हे बोल वस्तु वाचकं ॥ नव्हती हे शेष ॥ विचारांचें ॥ १९ ॥ ऐसे न इयें प्रसिद्धें॥चालिली सच्चिदानंद पदें॥मग द्रष्टया स्वसंवादें ॥ भेटती जेव्हां ॥२०॥ तेव्हेंळि वरषौनि मेघु॥ समुद्र होऊनि वोघु॥सरे दाउनि मागु ॥ राहे जैसा॥२१॥ फळ विऊनि फुल सुके ॥ फळ नाशे रस पाकें ॥ तोही रस उपके ॥ तृप्तिदानीं॥२२॥ कां आहुती अग्नि आंत॥ घालुनि वोसरे हात ॥ सुख चेवऊनि गीत ॥ ऊगा राहे ॥ २३ ॥ नाना मुखा मुख दाऊनि ॥ आरिसा जाय निगौनि ॥ कां निद्रलें चेवऊनि ॥ चेवविते जैसें॥२४॥ तैसें सच्चिदानंद चोखटा ॥ दाऊनि द्रष्टया द्रष्टा ॥ तिन्ही पदें लागती वाटा ॥ मौनाचिया ॥२५॥ जें जें बोलिजे तें तें नव्हे ॥ होय तें तंव न बोलवे ॥ साउलीवरि न मववे ॥ मवितें जैसें ॥२६॥ मग आपुलिया कडे ॥ मवितया जें सांपडे॥तें लाजलाजों आखुडें ॥ मविता जैसा ॥ २७ ॥ सत्ताचि स्वभावें॥असत्ता तवं नव्हे ॥ मां सत्त्व संभवें ॥ सत्तेसि काई ॥२८॥ आणि अचिदाचें-

नि नाशें ॥ आलें जें चिन्मात्र दशें ॥ आतां चिन्मात्र-
चि मा कैसें ॥ चिन्मात्रींयें ॥ २९ ॥ निद प्रबोधाचा
ठाईं ॥ नसे तैसें जागणेंही ॥ तेविं चिन्मात्राचि मा काई ॥
चिन्मात्रीये ॥ ३० ॥ ऐसें यया मुखपणें ॥ नाहीं कीरु
दुःख होणें ॥ मा मुख हें गणनें ॥ मुखासि काई ॥ ३१ ॥
ह्मणोनि सदसदत्वं गेलं ॥ चिदचिदत्वं मावळलें ॥ मु-
खामुख जालें ॥ कांहीं नाकीं ॥ ३२ ॥ आतां द्वंद्वाचें
लवंचक ॥ सांडूनि दुर्णाचें कंचुक ॥ मुख मात्रचि एक ॥
स्वयें आथी ॥ ३३ ॥ वरि यकपणें गणिजे ॥ तें गणितें
नसीये दुजें ॥ ह्मणोनि हें न गणिजे ऐसें येक ॥ ३४ ॥
मुखा आतोनि निघणें ॥ ते मुखिये मुखा तेणें ॥ हे मुख
मात्रचि मां कोणें ॥ अनुभवावें ॥ ३५ ॥ जै प्रकृती
डंकु अनुकरे ॥ तैं प्रकृति डंकें अवतरे ॥ मां डंकुचि तैं
भरे ॥ कोणकोणां ॥ ३६ ॥ तैसें आपुलेंनि मुखपणें ॥ जया
नाहीं मुखावणें ॥ आणि नाहीं हेंही जेणें ॥ नेणिजे मुख
॥ ३७ ॥ आरिसा न पाहतां मुख ॥ स्वयें सन्मुख ना विन्मुख ॥
तेवि नसोनि मुखामुख ॥ मुखचि जें ॥ ३८ ॥ सर्व सिद्धांता-
चिया उजरिया ॥ सांडूनियां निदसुरिया ॥ आपुलीया
ह्याना चोरीया ॥ आपणचि जे ॥ ३९ ॥ स लवितां उंस ॥
तो जैसेनि असे रस ॥ तेथिचा मिठांश ॥ तोचि जाणें
॥ ४० ॥ कां न मज्जितां वीणा ॥ जो नादु जो अबो-
लणा ॥ तया तेणेंचि जाणा ॥ होआवें लागे ॥ ४१ ॥
नाना पुष्पाचिया उदरा ॥ न येतां पुष्पसागरा ॥ आपण-
चि भंवरा ॥ होआवें पडे ॥ ४२ ॥ नाना न रांधितां
रस सोये ॥ ते गोडी कैसी कां पां आहे ॥ हे पाहणें ते
नोहे ॥ आणिका जोगि ॥ ४३ ॥ तैसें सुखपणा येवों ॥

लाजे आपुले मुख पावों ॥ तें आणिखां चाखों मुखो ॥ येईल काई ॥ ४४ ॥ दिहाचीया दुपारीं ॥ चांदु जैसा अंबरीं ॥ तें असणें चांदाचि वरि ॥ जाणावें कीं ॥४५॥ रूप नाहीं तें लावण्य ॥ आंगनुठे तें तारुण्य ॥ क्रिया न फुटे तें पुण्य ॥ कैसें असे ॥ ४६ ॥ जै न मनाचा अंकुर नुपजे ॥ तेथिलेन मकरध्वजे ॥ तोचि हा न माजे ॥ तरीच वडे ॥ ४७ ॥ कां वाद्य विशेषा सृष्टी ॥ जे जन्म नेघे दृष्टी ॥ तें नाद ऐसी गोष्टी ॥ नादाचि जोगी ॥ ४८ ॥ नाना काष्ठाचिया विटाळा ॥ वोसरलियांही अनळा ॥ मग लागणें केवळा ॥ आंगासीची ॥ ४९ ॥ दर्पणाचेनि नेमें ॥ विण जें मुखातीचें प्रमें ॥ आणिती ते वर्म ॥ वर्मती येणें ॥ ५० ॥ न पेरितां पीक जोडे ॥ तें मुडाची आहे रोकडें ॥ ऐसिया मोडे उघडे ॥ बोलणें हें ॥ ५१ ॥ एवं विशेष सामान्य ॥ दोहीं नातळे चैतन्य ॥ ते भोगिजे अनन्य ॥ तणेंसि सदा ॥ ५२ ॥ आतां यावरी जें बोलणें ॥ तें येणेंचि बोलें शाहाणें ॥ जें मौनाचें ही नीपटणें ॥ पीऊनि गेलें ॥ ५३ ॥ एवं प्रमाणा अप्रमाण ॥ पण केलें प्रमाण ॥ दृष्टांतीं वाइलीं आण ॥ दिसावयाची ॥ ५४ ॥ आंगाचिया अनुपपत्ती ॥ आठलियां उपपत्ती ॥ येथें उठली पांथती ॥ लक्षणाची ॥ ५५ ॥ उपाय मागील पाये ॥ घेऊनि जाले वाये ॥ प्रतीति मांडिलि सोये ॥ प्रत्ययाची ॥ ५६ ॥ येथें निर्धारेंसी विचार ॥ निमोनि जाला सार ॥ स्वामिचा संकटीं शूर ॥ सुभटु जैसा ॥ ५७ ॥ नाना नाश साधुनि आपुला ॥ बोधबोधे लाजीनला ॥ नुसुधेपणें थोटावला ॥ अनुभउ येथें ॥५८॥ भिंगाचिया

चडळा ॥ पटगाचा पुंज वेगळा ॥ करितां जैसा निफळा॥ आंगाचा होय ॥ ५९ ॥ कां गजवजील्या उवा ॥ पांघुरणें केळींचा गाभा ॥ मांडी तें व्हेळींउभा ॥ कैंचा कीजे ॥ ६० ॥ तैसें अनुभव्य अनुभाविक ॥ इहिं दोहीं अनुभविक ॥ तें गेल्यागा कैंचें एक ॥ येकार्मांची ॥ ६१ ॥ अनुभवा हा टावोवरी ॥ आपुलीचि अवसरी ॥ तेथें अक्षराचि हारी ॥ वाइल काई ॥ ६२ ॥ कां परेसि पडे मिठी ॥ तेथें नादाचा मात्र मळु नुठी ॥ मा वावरीजेल वोटी ॥ हेंके आहे ॥ ६३ ॥ चेइलियाही पाठीं ॥ चेवण याच्या गोठी ॥ कीं भाल्या वेम पाठीं ॥ रंभनाच्या ॥६४॥ उदेलिया दिवसपती ॥ तै कि दिवे मजे यति ॥ वांचोनि पिकल्या सेती ॥ मुडजनानि नागर काई ॥ ६५ ॥ म्हणोनि बंध मोक्षाचें व्याज ॥ नाहीं निमालें काज ॥ आतां निरोपण सोज ॥ वोळगे जरि ॥ ६६ ॥ आणि पुढिला कां आपणापें ॥ विचारावेन हातें हारपे ॥ मग शब्दीचि वेंपें ॥ आटउनियां ॥ ६७ ॥ येतुलियाहि परी ॥ चांगावे नाहि शब्दातें ॥ जरी स्मारकपणें कीर्तीतें ॥ मिरवी हा जगीं ॥ ६८ ॥ इतिश्रीसिद्धानुवादेश्रीमदनुभवामृतें सच्चिदानंदपदत्रयविवरणं नामपंचम प्रकरणं संपूर्णम ॥

---

## प्रकरण ६.

श्रीगुरुनाथाय नमः ॥ वापु उपेगी वस्तु शब्दु ॥ स्मरण दानि प्रसिद्धु ॥ अमूर्ताचा विशदु ॥ आरिसा नव्हे ॥ १ ॥ पाहतें आरिसां पाहे ॥ येथें कांहीं च नवल नव्हे ॥ परि दर्पणें यणे होये ॥ न पाहतें पाहते

॥ २ ॥ वडिला अव्यक्तनिया वंशा ॥ उद्योतकार सूर्य जैसा ॥ येणें येकें गुणें आकाशा ॥ अंबरत्व ॥ ३ ॥ आपण तरि खपुष्प ॥ परि फळ दे जगद्रुप ॥ शब्द मबिते अमृप ॥ कोण आहे ॥ ४ ॥ विधिनिषेधाचिया वाटा ॥ दाविता हाचि दिवटा ॥ बंधमोक्ष कळिकटा ॥ शिष्ठु हाचि ॥ ५ ॥ हा अविद्येचिया आंगी पडे ॥ तैं-नाथिले ऐसें रूडे ॥ न व्हाहिजे तिन कवडे ॥ साचा वस्तु ॥ ६ ॥ शुद्ध शिवाचा शरीरिं ॥ कुमार हाचि जिउ भरि ॥ जेवि आंगे पंचाक्षरि ॥ तेविचि बोलु ॥ ७ ॥ जीव देहे बांधला ॥ तो बोलें येकें सुटला ॥ आत्मा बोलें भेटला ॥ आपण यां ॥ ८ ॥ दिवसां तें उगो गेला ॥ तव रात्रिचा द्रोहो आला ॥ ह्मणोनि सूर्या या बोला ॥ उपमा नव्हेचि ॥ ९ ॥ जे प्रवृत्ती आणि निवृत्ती ॥ विरुद्धा इया हातु धरिती ॥ मग शब्देंचि चालती ॥ एकलेनी ॥ १० ॥ सहाय आत्मविद्येचें ॥ करावया आपण वेचे ॥ गोमटें काय शब्दाचें ॥ एकैक वाणु ॥११॥ किंबहुना शब्दु ॥ स्मरण दानि प्रसिद्धु ॥ परि तयांही समंधु ॥ नाहीं येथें ॥ १२ ॥ आत्मया बोलाचें ॥ कांहीं उपेगा न वचे ॥ स्वसंवेद्या कोण्हाचें ॥ बोलें आथी ॥ १३ ॥ आठवे का विसरे ॥ विषो होऊनि अवतरे ॥ तरि वस्तुसि वस्तु दुसरें ॥ असेना कीं ॥१४॥ आपण आपण यातें ॥ आठवि विसरे केउते ॥ काय जिभी जिभेतें ॥ चाखे न चाखे ॥१५॥ जागणें पां निद नाहीं ॥ मां जागणें घडे काई ॥ स्मरणा स्मरण दोन्हींही ॥ स्वरूपीं तैसी ॥ १६ ॥ सूर्यो रात्री पां नेणें ॥ मा दिवो काय जाणें ॥ तवि स्मरणा

स्मरणें ॥ आपण वस्तु ॥ १७ ॥ एवं स्मरणास्मरण नाहीं ॥ तरि स्मारकें काज काई ॥ ह्मणोनि इये ठाईं ॥ बोलु न मरे ॥ १८ ॥ आणिक एक शब्दें ॥ काजकी रु भलें मानें ॥ परि धिवसा न बंधे ॥ विचारु येथें ॥ १९॥ कां जे बोलें अविद्या नासे ॥ मग आत्मेन आत्मा भासे ॥ ह्मणत खेव पिसें ॥ आलेंचि कीं ॥ २० ॥ सूर्यी रात्रीपा मारिल ॥ मां आपणयां उदो करिल ॥ हें कुडे न मरती बोल ॥ साचाचा गांवि ॥ २१ ॥ चेइलें निदे रुस ॥ एसें कि निद आस ॥ कि चेइलें चेउ बैसे ॥ एसें नेणें आहे ॥ २२ ॥ ह्मणोनि नाशा पुरती ॥ अविद्या नाहीं निरुति ॥ नाहीं आत्मा आत्मस्थिति ॥ रिगे एसा ॥ २३ ॥ अविद्या तंव स्वरूपें ॥ वांझेचें कीर जाउपें ॥ सा नकोचें खुरपें ॥ खांडे कोणां ॥ २४ ॥ इंद्रधनुष्या मिते ॥ कवण धनवई न घलिजे ते ॥ ते दिसे तेंस होते ॥ साच जरी ॥ २५ ॥ अगस्तीचिया कौतुका ॥ पुरति जरि मृग तृष्णिका ॥ तरि मार देतो तर्का ॥ अविद्येसी ॥ २६ ॥ साहे बोलाचि वळघी ॥ एसी अविद्या असे जगीं ॥ तरि जालना कां आगी ॥ गंधर्व नगरें ॥ २७ ॥ ना तरि दिपाचि सोय ॥ आंधारें कीर न साहे ॥ तेथें कांहीं आहे ॥ जावया नेग ॥ २८ ॥ नातरि पाहावया दिवसु ॥ वातिचा कीजे सोसु ॥ तेव्ह-डांही उद्यमु ॥ उद्यमु पडे ॥ २९ ॥ जेथें साउलि न पडे ॥ तेथें नाहीं जेणें पाडें ॥ सा पडे तेथें तेव्हडे ॥ नाहींच कीं ॥ ३० ॥ दिसतचि स्वप्न लटिकें ॥ हें जागर्गी होय ठाउकें ॥ तवि विद्या काळीं सतुकें ॥ अविद्या नाहीं ॥ ३१ ॥ वोडंबरिचिया लेणियां ॥ घरभरी आतु-

डलीयां ॥ नागिवे नागविलीयां ॥ विशेषु काई ॥ ३२ ॥
मनोरथाचे परियळे ॥ आरोगिजतु कां लक्ष वेळे ॥ पारि
उपवासा वेगळे ॥ आनुआथी ॥ ३३ ॥ मृगजळ जेथं
नृमंडे ॥ तेथं असे पां कोरडे ॥ मा उमटे तेथं जोडे ॥
बोल्हासु काई ॥ ३४ ॥ हे दिसे तैसें असे ॥ तरि चि-
त्रिचेनि पाउसें ॥ बोल्हावतु कां माणुसें ॥ आगरांतळीं
॥ ३५ ॥ काल्उनी आंधारें ॥ लीहां येती अक्षरें ॥
तारि मसिचिये बोरवारें ॥ कां शिणावें ॥ ३६ ॥ आ-
काश काय निळें ॥ न दवतु हे डोळे ॥ तेवि अविद्येचन
टवाळें ॥ जाणोन घेई ॥ ३७ ॥ अविद्या येणें
नावें ॥ मी विद्यमानचि नव्हे ॥ हें अविद्याचि स्वभा-
वें ॥ सांघतसे ॥ ३८ ॥ आणि इयें अनिर्वाच्यपणें ॥
ते दुजेही देवांगणें ॥ आपुला आभावी आपणें॥ साधी-
तसे ॥ ३९ ॥ ना कांहींच जगी आहे ॥ तरि निर्धारु
कां न साहे ॥ वरि घटा भावीं भोये ॥ अकांत दिसे
॥ ४० ॥ अविद्या नांशी आत्मा ॥ ऐसी नव्हे प्रमा ॥
सूर्या आंगी तमा ॥ जयापरी ॥ ४१ ॥ हें अविद्या
तरि मायावि ॥ पारि मायावीपण ल्पवि ॥ हे साचा
आली अभांवी ॥ आपुला हें ॥ ४२ ॥ बहुतांपरि ऐ-
सि ॥ अविद्या नाहीं आपैसी ॥ आतां बोलु हातवसी ॥
कवणावरी ॥ ४३ ॥ साउलि येतें साबळें ॥ हाल्यां
भोय आडळें ॥ कीं हले न अंतराळें ॥ थोटावे हातु
॥ ४४ ॥ कां मृगजळाच्या पानीं ॥ गगनाचा आळीं-
गनि ॥ नां तरि चुंबनी ॥ प्रतिबिंबाचा ॥ ४५ ॥ उठा-
वला बोथरे तंवका ॥ तो सुनाथा पडे असिका ॥ अवि-
द्या नांशी तर्का ॥ तैसे होये ॥ ४६ ॥ ऐसि अविद्या

नामावी ॥ हें वाहेल जो जीवीं ॥ त्याणें माली काढावी॥ आकाशाची ॥ ४७ ॥ तेणें सेळि गळा दोहावी ॥ गुडगा डोळा वास पाहवी ॥ वाळऊनी कापरी करावी ॥ सांज वेळेची ॥ ४८ ॥ जांभे वाटुनि रसु ॥ तेणें काढावा बहुवसु ॥ काल्ऊनि आळसु ॥ मोदळा पाजावा ॥ ४९ ॥ तो पाटापाणी पगतु ॥ पडली सावली उलथु॥ वारयाचे तांथु ॥ वळुं सुखें ॥ ५० ॥ तो बागुलातें मारूं ॥ प्रतिबिंब खोळे भरूं ॥ तळहातींचें विंचरूं ॥ केश सुखें ॥ ५१ ॥ घटाचें नाहींपण फोडूं ॥ गगनाचीं फुलें तोडूं ॥ ससियाचें मोडूं ॥ सिंग सुखें ॥ ५२ ॥ तो कापुराचि मसी करूं ॥ रत्नदीपीं काजळ धरूं ॥ वांझेचें लेंकरूं ॥ परणु सुखें ॥ ५३ ॥ तो अवसेचेनि सुधाकरें ॥ पोसूं पाताळींचीं चकोरें ॥ मृगजळींचीं जळचरें ॥ गाळूं सुखें ॥ ५४ ॥ अहो हें किति बोलावें ॥ अविद्या खरी अभावें ॥ आतां काय नाशावें ॥ शब्दें येणें ॥ ५५ ॥ नाहीं तयाचेनि नाशें ॥ शब्द नये प्रमाण दशें ॥ आंधारीं आंधारा जैसें ॥ नव्हे रूप ॥ ५६ ॥ अविद्याचि नाहीं जाति ॥ तेथें नाहीं म्हणत या युक्ति ॥ जेविं दुपारीं कां वाती ॥ आंगणीचया ॥ ५७ ॥ न पेरितां सेतीं ॥ जेवीं सवंगणीया जाति ॥ तया लाजा परतीं ॥ जोडी आहे ॥ ५८ ॥ सवणिया चा आंगा ॥ जेणें केला वळघा ॥ तो न करीतांचि उगा ॥ घरीं होता ॥ ५९ ॥ पाणियावरी वरखु ॥ होता कें असे विशेखु ॥ अविद्या नाशीं उन्मेखु ॥ फांकावा तैसा ॥ ६० ॥ माप मापपणें ठावे ॥ जंव आकाश मऊं न रिघे ॥ तम पाहतां वाउगें॥ दीपाचें जन्म॥६१॥

गगनाचि रससोयें ॥ जिभ जैं आरोगुं जायें ॥ मग रस- ना हे होये ॥ अडनांव कीं ॥ ६२ ॥ नव्हतेन वल्लभें ॥ अहेवपण कां शोभे ॥ खातां केळीचे गाभे ॥ न खातां गेले ॥ ६३ ॥ स्थूल सूक्ष्म कवण येकु ॥ पदार्थ न प्र- काशी अर्कु ॥ परि रात्रिविषि अप्रयोजिकु ॥ जालाचि कीं ॥ ६४ ॥ दिठि पाहतां काय न फवे ॥ परि निदेतें तव न देखवे ॥ चेता तें न संभवे ॥ ह्मणोनियां ॥ ६५ ॥ चकोराचिया उद्यमा ॥ लटिकेपणाचि सीमा ॥ जरी दि- हाचि चंद्रमा गिवसुं बैसें ॥ ६६ ॥ नुसधियेचि सां चा ॥ मुका होय वाचकाचा ॥ अंतराळि पायांचा ॥ पेंधा होये ॥ ६७ ॥ अविद्येसी सन्मुखे ॥ मिळेचि प्रति- सेदकें ॥ उठिली निरार्थकें ॥ जल्पें होतीं ॥६८॥ अंव- से आला सुधाकरू ॥ न करीच कायि अंधःकारु ॥ अविद्या नाशीं विचारु ॥ तैसा होये ॥ ६९ ॥ ना- ना न निफजतेन अन्नें ॥ जेवणें तेचि लंघने॥निमाल्हे न नयनें ॥ पाहाणाचि अंधु ॥७०॥ कैसेन ही वस्तु नसे ॥ तेथ जैं शब्दाचा अर्थ हो बैसे ॥ तैं निरर्थकपणें नाशे॥ शब्द हिं थिता ॥ ७१ ॥ आतां अविद्याचि नाहीं ॥ हें कीर ह्मणों काई ॥ परि नाशितां कांहीं॥नुरेचि शब्दा चें ॥ ७२ ॥ या लागि अविद्येचिया मोहरा ॥ उठि- लिया हिं विचारा ॥ अंगाचिया संसारा ॥ होउनि ठेला ॥ ७३ ॥ ह्मणोनि अविद्येनेनि मरणें ॥ प्रमाणा येईल बोलणें ॥ हें अविद्याचि नाहींपणें ॥ नेदि घडो ॥ ७४ ॥ आणि आत्मा हन आत्मयां ॥ दाऊनि बोलु महिमेयां ॥ येईल हें सवियां ॥ विरुद्धची ॥ ७५ ॥ आपण या आपणपेसीं ॥ लागलें लग्न कवणे देशीं ॥ कीं

सूर्य आंग ग्रासी ॥ ऐसें ग्रहण आहे ॥ ७६ ॥ गगन आपणया निघे ॥ सिंधु आपणपां रिघे ॥ कीं तळहात काय वळघे ॥ आपणपयां ॥ ७७ ॥ सूर्य सूर्यासि विवळे ॥ फळ आपणयां फळे ॥ कीं परिमळु परिमळें ॥ घेपतसे ॥ ७८ ॥ चराचरा पाणी पाजणी ॥ करूं येई-ल येकें क्षणीं ॥ परि पाणियासि पाणी ॥ पाजों ये काई ॥ ७९ ॥ मार्तिशां दिवसा ॥ माजी एखादा होय ऐसा ॥ जे सूर्यासी सूर्य जैसा ॥ डोळा दावी ॥ ८० ॥ कृतांत जरि कोपेल ॥ तरि त्रैलोक्य हें जाळील ॥ वाचुनी आगी लावील ॥ आगिसी काई ॥ ८१ ॥ आपण पें आपणयां ॥ दर्पणेंवीण धात्रेया ॥ समोर होआवया ॥ ठां कीं आहे ॥८२॥ दिठि दिठितें रिगों पाहे ॥ रुचि रुचितें चाखुं सुये ॥ कीं चेतया चेवऊं ये ॥ हें नाहींच कीं ॥ ८३ ॥ चंदन चंदनपणा लावी ॥ रंगु रंगुपणा रावी ॥ मोतीपण मोती लेववी ॥ ऐसें कैंचें ॥ ८४ ॥ सोनेपण सोनें कसी ॥ दिपपण दिप प्रकाशी ॥ रसपण बुडि दे रसि ॥ ते कें जोडे ॥ ८५ ॥ आपुले मुकुटि समर्था ॥ चंद्र बैसविला सर्वथा ॥ परि चंद्र चंद्राचिये माथां ॥ वाऊं ये काई ॥ ८६ ॥ तैसा आत्मराज तंव ॥ ज्ञान मात्रचि भरीव ॥ आतां ज्ञानें ज्ञानासी स्वेव ॥ कैसें दीजे ॥ ८७ ॥ आपुनेंल जाणपणें ॥ आपणयातें जो नेणें ॥ डोळ्या आपुलें पाहाणें ॥ दुवाड जैसें ॥ ८८ ॥ आरिसा आपुलिये ॥ आंगीं आपणा पाहे ॥ तैं जाणणें जाणों लाहे ॥ आपणयातें ॥ ८९ ॥ दिगंता पैलिकडेचें ॥ धावोनि सूर्या खोंचे ॥ मां तिये काये तियेचें ॥ आंग फुटे ॥ ९० ॥

रसवृत्तिसी उगाणें ॥ घेऊनि जिव्हाग्राशाणें ॥परि काइ कीजे नेणें ॥ आपणपें चाखों ॥ ९१ ॥ तरी जीभ काये आपुलें ॥ चाखणें हान ठेलें ॥ तैसें नव्हे संचलें ॥ तेचि तें कीं ॥ ९२ ॥ तैसा आत्मा सच्चिदानंदु ॥ आपणयां आपण सिद्धु ॥ आतां काय दे शब्दु ॥ तयाचा तयां ॥ ९३ ॥ कोणा ही प्रमाणाचेन हातें ॥ वस्तु घेना न घे आपणयातें ॥ जे स्वयें आपणयातें ॥ घेणें ना घेणें ॥ ९४ ॥ ह्मणोनि आत्मा आत्मलाभें ॥ नांदऊनि शब्द शोभे ॥ येईल ऐसा न लभे ॥ ऊमसू घेवों- ॥ ९५ ॥ एवं माध्यान्हीची दिवि ॥ तम धाडीना दिवो दावी ॥ तैसि उभयेतां पदवी ॥ शब्दा जाली ॥ ९६ ॥ आतां अविद्या नाहींपणें ॥ नाहीं तये नासणें ॥ आत्मा सिद्धुचि मां कोणें ॥काय साधावें ॥९७॥ ऐसा उभयपक्षीं ॥ बोल न लाहोनि नखि ॥ हारतला प्रळयोदकीं ॥ वोघु जैसा ॥ ९८ ॥ आतां बोला भागु कांहीं ॥ असणें जयाचा ठाईं ॥ अर्थता तरी नाहीं ॥ निपटूनियां ॥ ९९ ॥ बागुल आला ह्मणतें ॥ बोलणें जैसें रितें ॥ कां आकाश वोळंबतें ॥ तळहातीं ॥ ॥ १०० ॥ तैसी निरार्थकें जल्पें ॥ होऊनियां सपडपें ॥ शोभती जैसीं लेपें ॥ रंगावरी ॥१०१॥ एवं शब्दैक जीवनें ॥ बापुडीं ज्ञानें अज्ञानें ॥ साचपणें वनें ॥ चित्रींचीं जैसीं ॥१०२॥ या शब्दाचा निमाला ॥ महा प्रळयो हों सरला ॥ अभ्रा सवें गेला ॥ दुर्दिनु जैसा ॥१०३॥ इतिश्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते शब्दखंडणं नाम षष्ठप्रकरणंसंपूर्णम् ॥

---

## प्रकरण ७.

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ येऱ्हवीं तऱ्हीं अज्ञाना ॥ जें ज्ञाना नमें शोभना ॥ तें तऱ्हि काना ॥ स्वाळिपि दडे ॥ १ ॥ आडमूनि आंधारीं ॥ खद्योत दिसी शीरमिरि ॥ तैसं लटिकें वरी ॥ आनादि होये ॥ २ ॥ जैसी स्वप्नीं स्वप्न महिमां ॥ तमीं मानु असे तमां ॥ तेवीं अज्ञाना गरीमां ॥ अज्ञानींची ॥ ३ ॥ कोल्हेरीचे वारु ॥ न येती भारकीं भरुं॥ न ये लेणा शृंगारु ॥ वोडंबरीचा ॥ ४ ॥ हे जाणणयाचा घरीं ॥ खोंचिलें हीं आन न करी ॥ काइ चांदीणां उठे लहरी ॥ मृगजळाची ॥ ५ ॥ आणि ज्ञान हे जे म्हणिजे ॥ तें अज्ञानचि पां दुजें ॥ एक लपऊनि दाविजें ॥ ऐका जैसें ॥ ६ ॥ असो आतां हा प्रस्तावो ॥ अधीं अज्ञानाचा धांडोळा घेवों ॥ मग तयाचा साचीं लाहों ॥ ज्ञानही लटिकें ॥ ७ ॥ या अज्ञान ज्ञानातें ॥ अधीष्टूनी जरी असतीतें ॥ जेथं असं तयातें तेणकां न करी ॥ ८ ॥ अज्ञानें जेथें असावें ॥ तेणें सर्व तेण होआवें ॥ ऐसी जाति स्वभावें ॥ अज्ञानाची ॥ ९ ॥ तरी शास्त्रमत ऐसें ॥ जे आत्मींच अज्ञान असे ॥ आणि तेणें तो गिवसे ॥ आश्रो जरी ॥ १० ॥ तरी नुठितां दुजे ॥ अज्ञाच असे बीजें ॥ तें तेचि आधी हें बुझें ॥ कोण येथें ॥ ११ ॥ अज्ञान तंव आपणयांतें ॥ जडपणें नेणें निरुतें ॥ आणि प्रमाण प्रमाणातें ॥ होत आहे ॥ १२॥ यालागि जरी अज्ञान ॥ करील आपुलें ज्ञान ॥ हें म्हणत खेव घेवची मौन ॥ विरोधुचि ॥ १३ ॥ आणि जाणती वस्तु एक ॥ येणें अज्ञानें केली मूर्ख ॥ तें अज्ञान

हे लेख ॥ कवण धरी ॥ १४ ॥ अहो आपणयाही पुरता ॥ नेणु न करवें जाणता ॥ तया अज्ञान ह्मणतां ॥ लाजिजे कीं ॥ १५ ॥ आभाळें भानू ग्रासे ॥ तें आभाळ कोणें प्रकाशे ॥ सुषुप्ति सुषुप्तेया रुसे ॥ तैं तेचि कोणां ॥ १६ ॥ तैसें अज्ञान असे जेथें ॥ तेच जरी अज्ञान आतें ॥ तरी अज्ञान अज्ञानातें ॥ नेणतां गेलें ॥ १७ ॥ नातरी अज्ञान एक घडे ॥ हें जयास्तव निवडे ॥ तें अज्ञान नव्हे फुडें ॥ कोण्हें काळीं ॥ १८ ॥ पडळ ही आथी डोळां ॥ आणि डोळां नव्हे आंधळा ॥ तरी आथ यया पोकळा ॥ बोलिया कीं ॥ १९ ॥ इंधनाचा अंगी ॥ खवळले न आगी ॥ ते न जळे तरी वाउगी ॥ शक्तिचि ते ॥ २० ॥ आंधारु कोंडोनि घरीं ॥ घरा पडसाई न करी ॥ तैं आंधारु इंही अक्षरीं ॥ न ह्मणावा कीं ॥ २१ ॥ वो जावो नेंदि जागणें ॥ तिये निदेलें निद कोण ह्मणें ॥ दिवसा ना आणी उणें ॥ तें रात्रि कैचि ॥२२॥ तैसा आत्मा अज्ञान असिकें ॥ असतां तो न मुके ॥ तें अज्ञान शब्दा लाटकें ॥ आलेंचि कीं ॥ २३ ॥ येऱ्हवीं तरी आत्मया ॥ माजी अज्ञान असावया ॥ कारण ह्मणतां न्याया ॥ चुकि येईल कीं ॥ २४ ॥ अज्ञान तम मेळणीं ॥ आत्मा प्रकाशाची खाणी ॥ आतां दोहिं मिळणीं ॥ एकी कैसी ॥ २५ ॥ स्वप्न आणि जागरु ॥ आठऊ आणी विसरु ॥ हे युग्में एका हारु ॥ चालति जरी ॥ २६ ॥ शिता तापा एकवट ॥ वाहे वस्तिची वाट ॥ कां तमें बांधिजे मोट ॥ सूर्य रश्मिची ॥ २७ ॥ नाना राति आणि दिवो ॥ येती यके ठाई राहों ॥ तैं आत्मा

जिवेंजिवो ॥ अज्ञानाचेनि ॥२८॥ हें असो मृत्यु आणि जिणें ॥ ये शोभती जरी मेहुणें ॥ तरी आत्मे न असणं ॥ अज्ञानेसी ॥ २९ ॥ अहो आत्मेन जे बाधे ॥ तेंचि आत्मेनसी नांदे ॥ ऐसी काइसि विरुद्धें ॥ बोलणि इयें ॥ ३० ॥ अहो आंधारपणीचि पैज ॥ मांडुनि आंधार तेज ॥ जाला तें सहज ॥ सूर्य निभ्रांतचि ॥ ३१ ॥ भेदु लांकुडपण मांडिलें ॥ आणि आगीपण मांडिलें ॥ तेंचि आगी जालें ॥ इंधन कीं ॥ ३२ ॥ गंगा पावत खेवो ॥ आनपणाचा ठावो ॥ मांडि तें गंगा हों ॥ लाहेपाणी॥३३॥ तैसें अज्ञान हें नोहे ॥ तरी आत्मा असके असो लाहे ॥ यऱ्हवीं अज्ञान होये ॥ लागलेंचि ॥ ३४ ॥ आत्मेनसि विरोधीं ॥ ह्मणोनि नृरचि इयें संमधी ॥ वेगळे तरी सिद्धी ॥ जायेचि ना ॥३५॥ लवणाची मासोळि ॥ जऱ्हि होय जिव्हाळी ॥ तरी जळी ना वेगळि ॥ न जिये जेंवि ॥ ३६ ॥ जें अज्ञान येथें नसे ॥ तरीच आत्मा असे ॥ ह्मणोनि बोलणी वायसें ॥ नायकावीं कीं ॥ ३७ ॥ दोरीं सर्पाभास होये ॥ तो तेणें दोरें बांधोये ॥ ना दवडणें न साहे ॥ जयापरी ॥ ३८ ॥ नाना पुनिवेचेनि आंधारें ॥ दिहाभेण राती मह्हुरें ॥ कियेतचि सुधाकरें ॥ गीळिजे जेंवि ॥ ३९ ॥ तियापरी उभयतां ॥ अज्ञान शब्द गेला वृथा ॥ हा तर्कावांचोन हाता ॥ स्वरूपें नये ॥ ४० ॥ तरी अज्ञान स्वरूप कैसें ॥ काय कार्यानुमेय असे ॥ कि प्रत्यक्षाचि दिसे ॥ धांडोळू आतां ॥ ४१ ॥ आहो प्रत्यक्षादि प्रमाणीं ॥ कीजे जयाचि वेणी ॥ ते अज्ञानाचि करणी ॥ अज्ञान नव्हे ॥ ४२ ॥ जैसी अंकुरेंसि सरळ॥ वेलि दिसे वेल्हाळ ॥ ते बीज नव्हे केवळ ॥ बीजकार्य

होये ॥ ४३ ॥ कां शुभाशुभ रूपें ॥ ममदृष्टि आरोपें ॥ तें निद नव्हे जाउपें ॥ निद्रेचे कीं ॥ ४४ ॥ नाना चांदु एकु असे ॥ तो व्योमीं दुणावला दिसे ॥ तें तिमिर कार्य जैसें ॥ तिमिर नव्हे पें ॥ ४५ ॥ तैसें प्रमाता प्रमेय ॥ प्रमाण जें त्रय ॥ तें अज्ञानाचें कार्य॥अज्ञान नव्हें ॥४६॥ म्हणोनि प्रत्यक्षादिकिं ॥ अज्ञान कार्यविशेखीं ॥ न घेपेयेविषि ॥ आनु नाहीं ॥४७॥अज्ञान कार्यपणें ॥ घेइजे तें अज्ञान म्हणणें ॥ तरी घनाही करणें ॥ तयाचेची ॥ ४८ ॥ स्वप्नीं दिसे तें स्वप्न ॥ मा देखतां काय आन ॥ तैसें कार्यचि अज्ञान ॥ केवळ जरी ॥४९॥ तरी चाखिला गूळ गूळें ॥ माखिलें काजळ काजळें ॥ कां घेपे दीप शूळें ॥ हाळया शूळें ॥ ५० ॥ तैसें कारण अभिन्नपणें ॥ कार्य ही अज्ञान होणें॥ ते अज्ञानचि मा कोणें ॥ काय घेपें ॥ ५१ ॥ आतां घेइजेते एसा ॥ विचारु नये मानसा ॥ तरी प्रमाण जाला मासा ॥ मृगजळिचा ना॥५२॥ तंव प्रमाणाचिया मापा ॥ न संपडेचि जे बापा ॥ तया आणि खपुष्पा ॥ विशेषु काई ॥ ५३ ॥ मां हें प्रमाणचि नुरवीं ॥ आतां आथी हे कोण प्रस्तावी ॥ यर्णेहीं बोलें जाणावी ॥ अज्ञान उखी ॥ ५४ ॥ एवं प्रत्यक्ष अनुमान ॥ यया प्रमाणा भाजन ॥ न होनि जालें अज्ञान ॥ अप्रमाण ॥५५॥ ना स्वकार्यातें विये ॥ जें कारणपणा नये ॥ मी अज्ञान ऐसें बिहे ॥ मानुसाचें॥५६॥ आत्मया स्वप्न दाऊं ॥ नसके कीर बहु ॥ परी ठाये ठाऊ ॥ निदे जो मेणें ॥ ५७ ॥ हें असों जिये वेळे ॥ आत्मैपणेंचि निखळे ॥ आत्मा अज्ञान मेळें ॥ असे तेणें ॥ ५८ ॥ मैसें न करितां मंथन ॥ काष्ठीं अवस्थान ॥

जैसें कां हुताशन ॥ सामर्थ्याचें ॥ ५९ ॥ तैसें आत्मा ऐसें नांव ॥ न साहे आत्मयाचि बरव ॥ तें कांहीं अज्ञान हाव ॥ बांधतें कां ॥ ६० ॥ काय दीप न लाविजे ॥ तेंचि काजळी फेडिजे॥कां नृगवति वाळिजे ॥ रुखाची छाया ॥ ६१ ॥ नाना नुठितां देह दशा ॥ काळऊनि लाविजे चिकसा ॥ न घडीतां आरिसा ॥ उठिजे काई ॥ ६२ ॥ कां वोहाचा दुर्भी ॥ मायचि असावि आधीं ॥ मग ते फेडू ईयें बुद्धीं ॥ पवाडु कीजे ॥ ६३ ॥ तैसें आत्मयाचा ठाई ॥ जे आत्मेपण ठाव नाहीं ॥ तें आज्ञान कांहीं ॥ मारीखे कैसें ॥ ६४ ॥ ह्मणोनि तेव्हां हीं अज्ञान नसे ॥ हें जालेंचि आपैसें ॥ आतां रिकामेंचि कायसें ॥ नाहीं ह्मणों ॥ ६५ ॥ ऐसा हि आत्मा जेव्हां ॥ जै नातळे भावाभावा ॥ अज्ञान असे तेव्हां ॥ तरी तें ऐसें ॥ ६६ ॥ जैसें घटाचें नाहिंपण ॥ फुटोनि होय शतचूर्ण ॥ किंवा सर्वापरी मरण ॥ मारखलें कीं ॥ ६७ ॥ नाना निदे निद आली॥ किंवा मूर्छा मूर्छे गेली ॥ कीं आंधारी पडली ॥ आंधकूपीं ॥ ६८ ॥ कां अभाव अवघडला । कां केळीचा गाभा मोडला ॥ चोळखा असुडला ॥ आकाशाचा ॥ ६९ ॥ कां निवाटियां मुदलें विख ॥ मुकियाचें बांधिलें मुख ॥ नाना नुठितां लेख ॥ पुसिलें जैसें ॥ ७० ॥ तैसें अज्ञान आपुली वेळ ॥ भोगी हेंचि टवाळ ॥ आतां तरी केवळ ॥ वस्तु होऊनि असे ॥ ७१ ॥ देखा वांझ कैसी विये ॥ विकळति माजिर्ली बिर्ये ॥ कि सूर्य कोणा लाहे ॥ आंधारातें ॥ ७२ ॥ तैसा चिन्मात्रीं चोखडा ॥ मलतैसा अज्ञाना ह्माडीं ॥ घेतला तऱ्हा पवाडा ॥ नये-

चि कीं तो ॥ ७३ ॥ जे मायेचीये चाडें ॥ डहुळिलें वुधाचें मांडें ॥ ते दिसे किंचि घडे ॥ तैसें हे पा ॥७४॥ नाना नीद् धरावया हातीं ॥ घेऊनि उठिला म्रडती ॥ ते लाभे की थिति ॥ नासली होये ॥ ७५॥ तेंवीं पाहाव-या अज्ञान ऐसें ॥ हें अंगीं पिसें कायसें ॥ न पाहतां अपैसें ॥ न पाहणेंचि कीं॥७६॥ एवं कोण्हे हीं परी ॥ अज्ञान भावाची उजरी ॥ न पडेचि नगरीं ॥ विचारा-चीये ॥ ७७ ॥ अहो कोण्हें हीं वेळे ॥ आत्मा अथवा वेगळें ॥ विचारार्चे डोळें ॥ देखते कां ॥ ७८ ॥ ना नि-धीराचें तोंड मांखे ॥ प्रमाण स्वप्नीं हीं नाइकें ॥ किं नि-रुति हा मुके ॥ अनसाईपणा ॥७९॥ ईतुलिया ही भागु॥ अज्ञाना तरी तो मागु ॥ निगे ऐसा बागु ॥ पडतां कां देवा ॥ ८० ॥ अवसेचेनि चंद्रबिंबें ॥ निर्वाळिलीये शोभे ॥ कां मांडलें जैसें खांबे ॥ शशिविषाणाचें ॥८१॥ नाना गगनौलांचीया माळा ॥ वांझेच्या झालिया गळां॥ घापती तो सोहळा ॥ पाविजेत असे ॥ ८२ ॥ आणूनि कासवीचें तुप ॥ भरूं आकाशाचें माप ॥ तरी साचा येती संकल्प ॥ असे ऐसें ॥ ८३ ॥ आह्मी येऊनि जा-ऊनि पुढतिं ॥ अज्ञान आणावें निरुतिं ॥ ते नाहीं तरी किती ॥ घतघतु पां ॥ ८४ ॥ ह्मणोनि अज्ञान अक्षरें नुमसुं आतां निदसुरें ॥ परी आन एक स्फुरें ॥ इये वि-षयीं ॥ ८५ ॥ आपणयांना आणीकांतें ॥ देखोनि होवे देखतें ॥ वस्तु ऐसीया पुरतें ॥ नव्हेचि अंगें ॥ ८६ ॥ तरी तें आपणया पुढें ॥ दृश्य पचळें येव्ह-डें ॥ आपण करी फुडें ॥ द्रष्टेपणं ॥ ८७ ॥ जेथें आ-त्यत्वाचें सांकडें ॥ तेथें उठे येव्हडें ॥ आणि उठिलें

तरी रोकडेंं॥देखत असों ॥ ८८ ॥ न दिसे जऱ्हीं अज्ञा-
न ॥ तऱ्ही आहे हें नव्हे आन ॥ यया दृश्या अनुमा-
न ॥ प्रमाण जालें ॥ ८९ ॥ नातरीं चंद्र एकु असे ॥
तो व्योमीं दुणावला दिसे ॥ तरी डोळां तिमिर ऐसें ॥
मानूं ये कीं ॥९०॥ भूमि वेगळि आडें ॥ पाणी घेती क-
वणीकडे ॥ न दिसती आणि अपाडें ॥ सांजि असती
॥ ९१ ॥ तरी भर्वेंमेनिमुळें ॥ पाणी घेती हें न टळे ॥
तैसें अज्ञान कळे ॥ दृश्यास्तव ॥ ९२ ॥ चेइलें यां निद्
जाय ॥ निद्रिता ठाउवी नव्हे ॥ परी स्वप्न दाऊनि आ-
हे ॥ ह्मणो ये कीं ॥ ९३ ॥ ह्मणोनि वस्तुमात्रें चोखें ॥
दृश्य जरी येव्हडें फांकें ॥ तेव्हां अज्ञान आथी सुखें ॥
ह्मणों येकीं ॥ ९४ ॥ अगा एसिया अज्ञानातें ॥ अज्ञान
ह्मणणें केउतें ॥ काय दिवो करी तयातें ॥ अंधारु ह्म-
णिपे ॥ ९५ ॥ अगा चंद्रापासूनि उजळ ॥ जेणें राविलें
वस्तु धवळ ॥ तया तें काजळ ॥ ह्मणिजत असे ॥ ९६ ॥
आगीचें काज पाणी ॥ निफजा जरी आणी ॥ अज्ञान
इया वाहाणीं ॥ मानु नरी तें ॥ ९७ ॥ कळीं पूर्ण चंद्र-
मा ॥ आणऊनि मेळवी आमा ॥ तरी अज्ञान नामा ॥
पात्र होइजे ॥ ९८ ॥ वोग्मोनि लोभें ॥ विष कां अमृत
दुभे ॥ न दुभे तरी लाभे ॥ विषचि ह्मणणें ॥ ९९ ॥
तैसा जाणणयाचा वेव्हारु ॥ जेथें सांवला सुमारु ॥
तेथें आणिजे पुरु ॥ अज्ञानाचा ॥ १०० ॥ तया नांव
अज्ञान ऐसें ॥ तरी ज्ञान होआवें तें कैसें ॥ येऱ्हवीं
कांहींच असे ॥आत्मा काई॥१॥ कांहींच जया न होणें ॥
होय तें स्वतां नणें॥शून्याचीं देवांगणें॥प्रमाणासी॥२॥ ऐसें
ह्मणावया जोगें ॥ नाचरे कीर अंगें ॥ परी साही लागे ॥

जोडावेंची ॥ ३ ॥ कोण्हाचें असणेंन विणें असे ॥ कोण्हीं न देखतांचि दिसे ॥ हें आथी तरी कायसें ॥ हारतले पण ॥ ४ ॥ मिथ्या वादाची कुटि आली ॥ ते निवांतचि साहिली ॥ विशेषा दिधली ॥ पाठि जेणें ॥ ५ ॥ जो निमालीही निंद देखे ॥ तो सर्वज्ञ येव्हडया काय चुके ॥ परी दृश्याचिये नटके ॥ सोईच जो ॥ ६ ॥ वेदु काय काय न बोले ॥ परी येथें नांवचि नाहीं घेतलें ॥ ऐसें कांहीं जोडलें ॥ नाहीं जेणें ॥ ७ ॥ सूर्य कोणा न पाहे ॥ परी आत्मा दाविला आहे ॥ गगन व्यापितां ठाये ॥ ऐसी वस्तु ॥ ८ ॥ देह हाडाची मोळी ॥ मी ह्मणोनि पोटाळी ॥ तो अहंकारु गाळी ॥ पदार्थु हा ॥९॥ बुद्धि बोध्या सोके ॥ ते येव्हढी वस्तु चुके ॥ मना संकल्प निके ॥ ययाहूनि ॥ १० ॥ विषयाचिया बरडी ॥ अखंड वासती तोंडी ॥ तें इंद्रिय गोडी ॥ न घेती हे ॥ ११ ॥ परी नाहींपणा सकट ॥ खाऊनि भरलें पोट ॥ तें कोणाहीं सकट ॥ कां फावेल॥१२॥जो आपणासी नव्हें तिखो ॥ तो कोणा लाहे देखो॥जे वाणी न सके चाखों॥ आपणा पैं ॥ १३ ॥ हें असो नांवें रूपें ॥ पुढामोनि असुपें ॥ जेथ आलीच वासीपें ॥ अविद्या हे ॥ १४ ॥ ह्मणऊनि आपुलेंचि मुख ॥ पाहावयाची भूक ॥ न बाणे मा आणीक ॥ कें रिघेल ॥ १५ ॥ नाडिलें जे वादि कुडे ॥ आंतुचि बाहेरी सवडे ॥ तैसा निर्णो सुनाथा पडे ॥ केलीया साता ॥ १६ ॥ का मस्तकांत निर्धारिली ॥ जो छाया उडों पाहे आपुली॥तयाचि फांकावली ॥बुद्धी जैसी ॥ १७ ॥ तैसें टणकोनी सर्वथा ॥ हें तों ऐसी व्यवस्था ॥ करी तो चुके हाता ॥ वस्तुचा जिये ॥ १८ ॥ आतां सां-

गिजे ते केउतें ॥ शब्दाचा संसारा नाहीं जेथें ॥ दर्शना बीजें तेथें ॥ गणीव आणी ॥१९॥ जयाचेनि बळें ॥ अचक्षुपण आंधळें ॥ फिटोनि वस्तु मिळे ॥ देखणी दशा ॥ २० ॥ आपुलेनि दृश्यपण ॥ उससों न लाहे आपण ॥ दृष्टत्वा कांग आण ॥ पडली असतां ॥ २१ ॥ कोणा कोण भेटे ॥ दिठि कोंच फुटे ॥ एक्या सकट पोटें ॥ आटोनि गेलीं ॥ २२ ॥ येव्हडें हि सांकडें ॥ जेणें सांडूनि एकीकडे ॥ उघडली कवाडें ॥ प्रकाशाची ॥ २३ ॥ दृश्यानिया सृष्टि ॥ दिठीवरी दिठी ॥ उठलिया तळवटी ॥ चिन्मात्रेचि ॥ २४ ॥ दर्शन गिळी सहुवसा ॥ चिन्तशत्रु मावल्या एसा ॥ ते शिळा न पोहे आगिसा ॥ वेद्यरत्नाचा ॥ २५ ॥ क्षणक्षणीं नित्य नवी ॥ दृश्याची चोख मदवी ॥ दिठी करवी वेदवी ॥ उदार जे ॥ २६ ॥ मागीलिये क्षणीचें अंग ॥ पारसी ह्मणोनि वेगें ॥ सांडूनि दृष्टी रिगे ॥ नवीया रूपा ॥२७॥ तेसीच प्रतीक्षणीं ॥ जाणवेची लेणीं ॥ लेवोनि आणी ॥ जाणतेंपणा ॥ २८ ॥ तया परमात्मपदींचें शाप ॥ ना कांहीं तया सुमास ॥ आणि होय येव्हडें काम ॥ चातल्या जेणें ॥ २९ ॥ सर्वज्ञतेच परी ॥ चिन्मात्राचें तों डावरी ॥ परी ते आन नगी ॥ जाणीजे ना ॥ ३० ॥ एवं ज्ञानाज्ञान गोठी ॥ तेही फांकतसे दिठी ॥ दृश्यपणें ये भेटी ॥ आपणीयां ॥ ३१ ॥ तें दृश्य सोटकें देखें ॥ आपण स्वयें द्रष्टत्वें तोखें ॥ तेंचि दिठीचेनि मखें ॥ माजि दाटि ॥ ३२ ॥ तेव्हां घेणें देणें घटे ॥ परी ऐक्याचें सूत न तुटे ॥ जेवीं मुखीं मुख वाटे ॥ दर्पण केलें ॥ ३३ ॥ अंगें अंगावरी पहुडे ॥ चेइला वेगळा

न पडे ॥ तया वारुवाचेंनि पाडे ॥ घेणें देणें ॥ ३४ ॥ पाणी कल्लोळाचेनि मिसे ॥ आपणापें वेल्हावे जैसें ॥ वस्तु वस्तुत्वें खेळों येतसे ॥ सुखें लाहों ॥ ३५ ॥ गुंफी वाज्वाळाचि या माळा ॥ लेइलीयां ही अनळा ॥ भेदाचिया अहाळा । काय पडणें आहे ॥ ३६ ॥ कीं रश्मिचेनि परिवारें ॥ वेढूनि घेतला थोरें ॥ तऱ्हीं सूर्यासी दुसर ॥ बोलों येइल ॥ ३७ ॥ चांदणियांचा गिवसु ॥ चांदावरी पडिलियां बहुवसु ॥ काय केवळपणीं त्रासु ॥ देखिजेल ॥ ३८ ॥ दळाचिया सहस्रवरी ॥ फांको आपुलिया परी ॥ परी नाहीं दुसरी ॥ भास कमळीं॥३९॥ सहस्र बाहिया ॥ आहाती सहस्रार्जुना राया ॥ तरी तो काय तियां ॥ एकोत्तरावा ॥ ४० ॥ सौकटाचीया वोजा ॥ पसरो कां बहुपुंजा ॥ परी तांथु वीन दुजा ॥ भाव आहे ॥ ४१ ॥ कोडिवरी शब्दाचा ॥ मेळावा घरीं वाचेचा॥मिनला तऱ्हीं वाचा।।मात्रकी तें।।४२।।तैसं दृश्याचें डाखळें॥नाना दृष्टीचें उमाळें।।उठती लेखांवेगळे॥ द्रष्टत्वेंचि ॥ ४३ ॥ गुळाचा बांधा ॥ फुटलिया मोडिचा धांद्रा ॥ झाला तऱ्हीं नुसधा ॥ गूळचि कीं तो ॥४४॥ तेसें हें दृश्य देखों॥किंबहू होऊनि फांको ॥ परी भेदाचा नव्हे विखों ॥ तेचि ह्मणोनी ॥ ४५ ॥ तया आत्मयाचा भाका ॥ न पडेचि दुसरी रेखा ॥ जऱ्हीं विश्वा असेखा ॥ भरलें आहे ॥ ४६ ॥ दुबंधीं क्षीरोदकीं॥ वानें परी अनेकीं ॥ दिसती तऱ्हीं तितुकीं ॥ सुतें आथी ॥ ४७ ॥ पातयाची मिठी ॥ नुकलतां दिठी ॥ अवघीयाची सृष्टी ॥ पाविजे जरी ॥ ४८ ॥ न फुटतां बीजकणिका ॥ माजि विस्तारें वटु असिका ॥ तरी अद्वैत

फांका ॥ उपमा आथी ॥ ४९ ॥ मग माते म्या न दे-
खावें ॥ ऐसें हीं भरें रहावें ॥ तरी अंगाचीये विसवे ॥
सेजेवरी ॥ ५० ॥ पातयाची मिठी ॥ पडिलियां काजे
दिठी ॥ आपुलीयेचि पोटीं ॥ रिगोनि असणें ॥ ५१ ॥
कां नुदेल्लियां सुधाकरु ॥ आपणपें भरें सागरु ॥ ना कू-
र्मि गिळी विस्तारुं ॥ आपें आप ॥ ५२ ॥ अवसेचिये
दिवशीं ॥ सत्तरावियें अंशीं ॥ स्वयें जैसें शशी ॥ रिग-
णें होय ॥ ५३ ॥ तैसे दृश्य जिणतां द्रष्टे ॥ पडिलें जै-
ताचीये कुटे ॥ तया नांव वावटे ॥ आपणपेंयां ॥ ५४ ॥
सहजें अवघेंची आहे ॥ तरी कोणा कोण पाहे ॥ तें न
देखणेंचि आहे ॥ स्वरूप निद्रा ॥ ५५ ॥ नाना
देखणें नको ॥ ह्मणे मिचि मातें देखों ॥ तरी आपेआप
विखो ॥ आपैसें असे ॥ ५६ ॥ जे अनादिच दृश्यपणें॥
अनादिचि देखणें॥हें आतां काय कोणें॥रचू जावें ॥५७॥
अवकाशेंसी गगना॥स्पर्शेंसी पवना ॥ दीप्तिसी तपना॥
समंधु कीजे ॥ ५८ ॥ विश्वपणें उजीवडें ॥ तरी विश्व
देखे पुढें ॥ नातें नाहीं तऱ्हीं तेव्हडें ॥ नाहींच देखें
॥ ५९ ॥ विश्वाचें असें नाहीं ॥ विपायें बुडालें याहीं॥
तऱ्हीं दशा ऐसी हीं ॥ देखतचि असे ॥ ६० ॥ कापु-
राही आथी चांदणें ॥ किं तेचि न मखे तेणें ॥ तैसें
केवळ देखणें ॥ ठायें ठावो ॥ ६१ ॥ किंबहुना ऐसें ॥
वस्तु भलतीये दशें ॥ देखतचि असें ॥ आपणपयातें
॥ ६२ ॥ मनोरथाचीं देशांतरें ॥ मनीं प्रकाशूनि नग-
रें ॥ मग तेथें आदरें॥हिंडे जैसे॥६३॥ कां दाटला डोळा
डोळयां ॥ डोळा चितारा होउनियां ॥ स्फुरें चोख ह्म-
णौनियां ॥ विस्मो नाहीं ॥ ६४ ॥ या लागिं एकेचि

द्रुपें ॥ आपणयां आपणपें।। देखिजे कां आरोपें ॥ काय काज ॥ ६५ ॥ कळिचें पांघरुण ॥ आपजवी रत्ना कोण ॥ कां सोने लें सोनेपण ॥ जोड जोडूं॥६६॥ चंदन सौरभ वेढी ॥ कां सुधा आपणयां वाढी ॥ किं गूळ चाखे गोडी ॥ ऐसें आथी हें ॥६७॥ की उजाळाचें कीळें॥कापुरापुटीं दिधलें॥कीं ताऊनि ऊन केलें ॥ आगी तें काई ॥ ६८ ॥ नाना ते लता ॥ आपुले वेलीं गुडाळतां॥ वर करी न करितां ॥ जयापरी ॥ ६९ ॥ कां प्रभेचा उभाळा ॥ दीप प्रकाशें संचला ॥तैसा चैतन्यें गिवसला॥ चिद्रूप स्फुरे ॥ ७० ॥ ऐसें आपणयां आपण ॥ आपुलें निरीक्षण ॥ करावें येणें वीण ॥ करितूचि असे॥७१॥ ऐसें हें देखणें न देखणें ॥ हें आंधारें चांदिणें॥ मां चंद्रासी उणें ॥ स्फुरतें कां ॥७२॥ ह्मणोनि हें न व्हावें ॥ ऐसेंही करूं पावे ॥ तरी तैसाचि स्वभावें ॥ आइता असे ॥ ७३ ॥ द्रष्टा दृश्य ऐसें ॥ दोनि अळुमाळ दिसें ॥ तेहीं परस्परानुप्रवेशें ॥ कांहीं ना कीं ॥७४॥ तेथें दृश्य द्रष्टां भरे ॥ द्रष्टेपण दर्शी सरे ॥ मा दोन्ही न होऊनि उरे ॥ दोहींचे साच ॥ ७५ ॥ मग भलतेथें भलतेंतेव्हां ॥ माझारिलें दृश्य द्रष्ट भावा ॥ आटणी करित खेवा ॥ येती दोन्हीं ॥ ७६ ॥ कापुरीं अग्नि प्रवेशु ॥ कीं अग्नि घातला पोतासु ॥ ऐसें नव्हे संवसारेसु ॥ वेचु झाला ॥७७॥ एका एकु वेचला ॥ शून्य बिंदु शून्यें पूसिला ॥ द्रष्टा दृश्याचा निमाला ॥ तैसें होये ॥ ७८ ॥ किंबहुना आपुलीयां ॥ प्रतिबिंबा झोंबिनलियां ॥ झोंबि सकट आठोनियां ॥ जाइजे जेवीं ॥७९॥ तैसे रुसतां दृष्टि ॥ द्रष्टादृश्यभेटी॥येती तेथ मिठी ॥ दोहींची पडे

॥ ८० ॥ सिंधूपूर्वापर ॥ न मिळती तवंचि सागर ॥ मग एकवट नीर ॥ जैसें होये ॥ ८१ ॥ बहुयेचि त्रिपुटी ॥ सहजें होय तया रहाटी ॥ प्रतिक्षणा कायटी॥ करीतसे ॥ ८२ ॥ दोन्ही विशेष गिळी ॥ नानिर्विशिष्टातें उगळी ॥ उघडी झांपी एकी डोळी ॥ वस्तुचि हे ॥ ८३ ॥ पातया पातें मिळे ॥ किं द्रष्टत्वें सेंघ पघळे ॥ तिये उन्मळितां मावळे ॥ नवलावो हा ॥ ८४ ॥ द्रष्टादृश्याचा ग्रासीं ॥ मध्यें लग्न विकाशी ॥ योगभूमिका ऐसी ॥ अंगीं वाजे ॥ ८५ ॥ उठिला तरंगु बैसे ॥ पुढं अनुहीं नुमसे॥एमाटाइ जैसें ॥ पाणी होय ॥ ८६॥ कां निद सरोनि गेली॥जागृती नाहीं चेइली॥ तेव्हां होय आपुली ॥ जैसी स्थिती ॥ ८७ ॥ नाना एका ठाउनि उठी ॥ अन्यत्र नव्हे पैठी ॥ हें गमे तैसिया दृष्टी ॥ दिठि सुतां ॥ ८८ ॥ कां मावळों सरला दिवो ॥ रात्रिचा न करी प्रस्तावो ॥ तेणें गगनें हा भावो ॥ चाखाणिला ॥ ८९ ॥ घेतला श्वासू बुडाला ॥ घापतां नाहीं उठिला ॥ तैसा दोहीं सिवतला ॥ नव्हे जो अर्थु ॥९०॥ किं आववयाची करणीं ॥ विषयाची घेणीं ॥ करीतांचि एके क्षणीं ॥ जे कीं आहे॥ ९१ ॥ तयासारिखा ठावो ॥ हा निराकाराचा आत्मभावो ॥ येणें कां पाहो ॥ न पाहों लाभे ॥ ९२ ॥ काय आपुलिये भूमिकें ॥ पाहों न पाहों सके ॥ हें कें आहे ॥ ९३ ॥ समोर पाठीमोरया ॥ मुखें होऊं ये आरसिया ॥ वांचूनि तया प्रतितिया ॥ होआवें कां ॥ ९४ ॥ सर्वांगें देखणा रवी ॥ परी ऐसें घडे केवीं ॥ जे उदो आस्तुचि चवी ॥ स्वये घेपे ॥ ९५ ॥ किं रसु आपणयां पिये ॥ किं तोंड

लपउनि ठाये ॥ हे रसपण नव्हे ॥ तया जैसें ॥९६॥ तैसें पाहणें न पाहणें ॥ पाहणेपणेंचि हों नेणें ॥ आणि दोन्हीं हे येणें ॥ स्वयेंचि असिजे ॥ ९७ ॥ जें पाहाणें-चि म्हणोनियां ॥ पाहणें नव्हे आपणयां ॥ तें न पाहणं आपसयां ॥ हाचि आहे ॥ ९८ ॥ आणि न पाहणें मां कैसें ॥ आपणपें पाहों बैसें ॥ तरी पाहाणें हें ऐसें ॥ हाचि पुढती ॥ ९९ ॥ हें दोन्हीं परस्परें ॥ नांदती एका हारें ॥ बांधोनि येरयेरें ॥ नाहीं केलें ॥२००॥ पाहणयां पाहणें आहे ॥ तरी न पाहणें हेंचि नव्हे ॥ म्हणोनि याचि सोये ॥ नेणती दोन्हीं ॥ १ ॥ एवं पा-हणें न पाहणें ॥ चोरोनियां असणं ॥ न पाहे तरी को-णें॥काय पाहिलें ॥ २ ॥ दिसत्यानि दृश्य भासे ॥ म्ह-णावें ना देखिलें ऐसें ॥ तरी दृश्यास्तव दिसें ॥ ऐसें नाहीं ॥ ३ ॥ दृश्य दृष्ठीं दिसे ॥ परी साचे कीं द्रष्टा असे ॥ आतां नाहीं तें कैसें ॥ देखिलें होये ॥ ४ ॥ मुख दिसों कां दर्पणिं ॥ परी असणें कीं तये मुखा-पणिं॥तरी जाली ते वायाणीं॥प्रतीति कीं॥५॥ देखताचि आपणयातें ॥ आलिये निदेचेनि हातें ॥ तया स्वप्ना ऐसें येथें ॥ निहाळिना ॥ ६ ॥ निद्रिस्तु सुखासनी ॥ वाहि-जे आनु वाहाणिं ॥ तो साचे काय ते सणीं ॥ दशा पावो ॥ ७ ॥ की सिसेविण एकएकें ॥ दाविली राज्य करिती रंकें ॥ तैसी तियें सतुकें ॥ आथी काई ॥ ८ ॥ ते निद्रा जेव्हां नाहीं ॥ तेव्हां जो जैसाचियें ठाईं ॥ तैसाचि स्वप्नीं कांहीं ॥ न दाविजे कीं ॥ ९ ॥ तान्हेलि-या मृगतृष्णा ॥ न भेटलियां सीनु जे साणा ॥ मां भेट-लियां कोणां ॥ काय भेटलें ॥ १० ॥ कीं साउलीयेचे-

नि व्याजें ॥ मेळविलें जेणें दुजें ॥ तयाचें करणें वांझें ॥ जालें जैसें ॥ ११ ॥ तैसें दृश्य करूनियां ॥तें द्रष्टयातें द्रष्टचा ॥ दाऊनि धाडिलें वायां ॥ दाविलें पणही ॥१२॥ जें दृश्य द्रष्टाचि आहे ॥ मां दावणें कां साहे॥न दविजे तरी नाहे ॥ तया तो काई ॥ १३ ॥ आरिसा पाहून राहे ॥ तरी मुखचि वायां जाये ॥ तेणेवीण आहे ॥ आपणपै कीं ॥१४॥ तैसें आत्मयातें आत्मया ॥ न दविजेचि पैं माया ॥ तरी आत्मा वावां कि वांयां ॥तेंचि कि ना ॥ १५ ॥ ह्मणोनि आपणपें द्रष्टा ॥ न करितां असे पैठा ॥ आतां जालाचि दिठा ॥ कां करावा ॥१६॥ नाना मागुतें दाविलें ॥ तरी पुनरुक्त तेंचि ज्ञालें ॥ येणें-ही बोलें गेलें ॥दावणें वृथा ॥१७॥ दोरा सर्पाभासा ॥ साचपणें दोरु कां जैसा ॥ द्रष्टा दृश्या तैसा ॥ द्रष्टा साचु ॥ १८ ॥ दर्पणें आणी मुखें ॥ मुख दिसे हें न चुके ॥ परी मुखीं मुख सतुकें ॥ दर्पणीं नाहीं ॥ १९ ॥ तैसे द्रष्टा दृश्या दोहीं ॥ माच कीं देखतां ठावो ॥ ह्मणोनि दृश्य तें वावो ॥ देखिलें जऱ्हीं ॥ २० ॥ वावा कीर होय ॥ तऱ्हीं दिसत तंव आहे ॥ येणें बोलें होये ॥ आथी ऐसें ॥ २१ ॥ तरी आन आनाते ॥ देखोनि होय देखतें ॥ तरी मानुयेतें ॥ देखिलें ऐसें ॥२२॥ येथें देखोनि कां न देखोनि ॥ ऐक्य कां नाना होऊनि॥ परी हा येणें वांचूनि॥ देखणें असे ॥२३॥ आरिशा न हो कां दाविलें ॥ तऱ्ही मुखचि मुख देखिलें॥तों नदवितऱ्हीं संचलें ॥ मुखचि मुखीं ॥ २४ ॥ तैसें दावितें नाहीं ॥ तरी हाचि ययाचा ठाई ॥ ना दवि तऱ्हीं हीं॥ हाचि ययां ॥ २५ ॥ जागृति दाविला ॥ कां निदा हा-

रविला ॥ परि जैसा एकिला ॥ पुरुष पुरुषिं ॥ २६ ॥ कां रायातें तूं रावो ॥ ऐसा दाविजे प्रत्ययो ॥ तऱ्हीं ठायें ठावो॥राजाचि असे ॥२७॥ नातरी रायपण राया ॥ नाणीजें कीं प्रत्यया ॥ तऱ्हीं कांहीं उणें तयां ॥ माजी असे ॥ २८ ॥ तैसें दावितां न दावितां ॥ हा यया परौता ॥ चढेना तुटेना आइता ॥ असतचि असे ॥ २९ ॥ तरी कां निमित्या पिसें ॥ हा यया दाऊं बैसें ॥ देखतें नाहीं तै आरिसें ॥ देखावें कोणें ॥ ३० ॥ दीपु दावि तया तें रची ॥ किं तेणेंचि सिद्धि दीपाची ॥ तैसि सत्ता निमित्ताची ॥ येणें साच ॥ ३१ ॥ वन्ही तें वन्हीं शिखा ॥ प्रकाशी कीर देखा ॥ परी वन्ही न हूनि लेखा॥ येईल काई ॥ ३२ ॥ आणि निमित्य जें बोलावें ॥ तें येणें दिसोनि दावावें ॥ देखिलें तऱ्हीं स्वभावें ॥ दृश्यहीं हा ॥ ३३ ॥ ह्मणोनि स्वयं प्रकाशा यया ॥ आपणापें देखावया ॥ निमित्त हा वांचोनियां॥नाहीं च मा ॥३४॥ भलते न विन्यासें ॥ दिसत तेणेंचि दिसें ॥ हा वांचूनि नसे ॥ येथें कांहीं ॥ ३५ ॥ लेणें आणी भांगारें ॥ भांगारचि एक स्फुरें ॥ कां जेथें दुसरें ॥ नाहींच ह्मणौनि ॥ ३६ ॥ जळ तरंगी दोन्हीं ॥ जळ वांचूनि नाहीं ॥ ह्मणोनि आन कांहीं ॥ नाहींना नोहे ॥ ३७ ॥ हो कां घ्राणानुभवो ॥ येऊं कां हाती घेवों ॥ लाभो का दिठि पाहो ॥ भलतैसा ॥३८॥ परी कापुराचा ठाई ॥ कापुरा वांचूनि नाहीं ॥ तैसा रीति भलते याहीं ॥ हाचि ययां ॥ ३९ ॥ आतां दृश्यपणें दिसों ॥ कां द्रष्टा होऊनि असों ॥ परी हा वांचूनि अतिसो ॥ नाहीं येथें ॥ ४० ॥ गंगा गंगापणें वाहों ॥ कां सिंधू होऊनि रा-

हां ॥ परी पाणीपण नवलावो ॥ न देखों कीं ॥ ४१ ॥ थिजावें कीं विघरावें ॥ हें अप्रयोजक अघवें ॥ घृतपण नव्हे ॥ अनारिसें ॥ ४२ ॥ ज्वाळा आणि वन्हीं ॥ न लेखिजती दोन्हीं ॥ वन्हीं मात्र ह्मणोनि ॥ आन नव्हे कीं ॥ ४३ ॥ तैसें दृश्य कां द्रष्टा ॥ या दोन्ही दशा वांझटा । पाहतां एकी काष्टा ॥ स्फूर्ति मात्र तो ॥४४॥ इयें स्फूर्ति कडोनि ॥ नाहीं स्फूर्ति मात्र वांचोनि ॥ तरी काय देखोनि ॥ देखतु असे ॥ ४५ ॥ पुढें फरके ना दिसतें ॥ नामागें डोकावि देखतें ॥ पाहातां येणें यया-तें ॥ स्फुरद्रूपचि ॥ ४६ ॥ कल्लोळीं जळीं घातलें ॥ सोनें न सोनें पांघुरलें ॥ दिठिचे पाय गुंतलें ॥ दिठि सीची ॥ ४७ ॥ श्रुतिसी मेळविली श्रुती ॥ दृतिसी मेळ-विली दृती ॥ कां जे तृप्तिसी तृप्ती ॥ वोगरली ॥४८॥ गूळ गूळें परवाडिला ॥ मेरु सुवर्णें मढिला ॥ कां ज्वाळा गुंडाळिला ॥ अनळु जैसा । ४९ ॥ हे बहू काय बोलिजे ॥ कीं नभ नभाचिये रिगे सेजे ॥ मग कोण निदि-जे ॥ कीं जागे कोणें ॥५०॥ हा येणें पाहिला ऐसा ॥ कांहीं न पाहिला जैसा ॥ आणि न पाहतां ऐसा ॥ पा-हाणेंचि हा ॥ ५१ ॥ येथें बोलणें न साहे ॥ चाणणें न समाये ॥ अनुभव न लाहे ॥ अंगि मिरों ॥ ५२ ॥ ह्म-णोनि ययातें येणें ॥ येपरींचें पहाणें ॥ पाहातां कांहीं कोणें ॥ पाहिलें नाहीं ॥५३ ॥ किंबहुना ऐसें ॥ आत्में-न आत्मा प्रकाशें ॥ न चेतुचि चेऊं बैसें ॥ तयासी तो ॥ ५४ ॥ स्वयें दर्शनाचिया सवा ॥ अवघियाचि जाति फावा ॥ परी निजात्मभावा ॥ न मोडतांहीं ॥ ५५ ॥ न पाहतां आरिसा असो पाहे ॥ तरी तेचि पहाणें

होये ॥ आणि न पाहणें तरी ते जाये ॥ न पाहणें पाहणें ॥ ५६ ॥ भलतैसा फांके ॥ परी एकपणा न मुके ॥ नाना संकोच्च तरी असिकें ॥ हाचि आथी ॥५७॥ सूर्याचिया हाता ॥ अंधःकारु नये सर्वथा ॥ मा प्रकाशाची कथा ॥ आइकतां कां ॥ ५८ ॥ आंधारु कां उजिवडु॥ हा एकला एकवडु ॥ जैसा कां मार्तंडु ॥ भलतेथें ॥ ५९ ॥ तैसा आवडतिये भूमिके ॥ आरूढलिया हीं कौतुकें ॥ परी तयातें हा न चुके॥हाचि ऐसा ॥ ६० ॥ सिंधूची सिव न मोडे ॥ पाणीपणा मळु न मोडे ॥ परी मोडुतुका गाडे ॥ तरंगाचें ॥ ६१ ॥ रश्मि सूर्यीचि आथी ॥ परी बिंबा बाहेरी जाती ॥ तरी बोध संपत्ति ॥ उपमा नोहे ॥ ६२ ॥ आणि पल्हेचा दोडा ॥ न पडतां तढा ॥ जग तवका घडा ॥ न भरेच कीं ॥ ६३ ॥ सोनयाचा रवा ॥ रवेपणाच्या ठेवा ॥ अवत्रेयाचि अवयवा ॥ लेणें नव्हे ॥ ६४ ॥ न फेडितां आडवावो ॥ दिगंतेनि दिगंता जावो ॥ नये मा पावो ॥ उपमा काई ॥ ६५ ॥ ह्मणौनि इयें आत्मलीळे ॥ नाहीं आन कांटाळें ॥ आतां ययाची येंतुलें ॥ हाचि यया ॥ ६६ ॥ स्वप्रकाशाचा घांसीं ॥ जेवितां बहू वेगेसी ॥ वेचेना परी कुसीं ॥ वास हीं न पडे॥६७॥ऐसा निरुपमा परी ॥आपुलिये विलासवरी ॥आत्मा राणीव करी ॥ आपुला ठाइ॥ ॥ ६८ ॥ तयातें ह्मणिपे अज्ञान ॥ तरी न्याया भरलें कीं रान ॥ आतां ह्मणे तयातें वचन ॥ उपसावो आह्मीं ॥ ६९ ॥ आत्मा प्रकाशितें अज्ञान ॥ ऐसें ह्मणणें हे न ॥ तरी निधि दावितें अंजन ॥ न ह्मणिजे काई॥७०॥

सुवर्णगौर अंबिका ॥ न ह्मणिजे काय काळिका ॥ तैसा आत्मा प्रकाशका ॥ अज्ञान वादु ॥ ७१ ॥ येऱ्हवीं शि वोनि पृथ्वीवरी ॥ तत्वाच्या वनिपरी ॥ जयाच्या रश्मि करी ॥ उनाळा येती ॥ ७२ ॥ जेणें ज्ञान सज्ञान होये॥ दृग्मात्र दृष्टीते वीये ॥ प्रकाशाचा दिवो पाहे ॥ प्रकाशासी ॥ ७३ ॥ ते कोण निकृष्टें ॥ दाविलें अज्ञानाचें- नि वेटें ॥ ना तमें सूर्ये मोठें ॥ बांधतां निकें ॥ ७४ ॥ अपूर्व ज्ञानाक्षरीं ॥ वसतां ज्ञानाची थोरी ॥ शब्दार्थाची उजरी ॥ अपूर्व नव्हे कीं ॥ ७५ ॥ लाखेचें मांदुसें ॥ आगीचि ठवणें कायसें ॥ आंतु बाहेरी मसिसें ॥ करूनि चाली ॥ ७६ ॥ ह्मणोनि जगज्ञान स्फिते ॥ बोलतां अ- ज्ञान वादाते ॥ विखुरली होती आंतें ॥ वाचे इयें ॥७७॥ अखरी तंव गोवधु ॥ पुढारा आनृत वाधु ॥ मा कैसा अज्ञान वादु ॥ कीजे ज्ञानी ॥ ७८ ॥ आणी अज्ञान ह्मणणें ॥ स्फुरतसे अर्थपणें ॥ आतां हेचि ज्ञान कोणें ॥ मानिजे ना ॥ ७९ ॥ असो हे आत्मराजें ॥ आपणपें जेणे तेजें ॥ आपणचि देखिजे ॥ बहु गे परीं ॥ ८० ॥ निर्वचितां जे झांवळे ॥ तेंचि लाहे डोळे ॥ डोळ्या पुढें मिळे ॥ तेंचि तया ॥ ८१ ॥ ऐसें जग ज्ञान जें आहे ॥ ते अज्ञान ह्मणें मीं विये ॥ येणे अनुमानें हो पाहें ॥ आथी ऐसें ॥ ८२ ॥ तंव अज्ञान त्रिशुद्धी नाहीं ॥ हें जगेंचि ठेविलें ठाईं ॥ जें धर्म धर्मित्व केहीं ॥ ज्ञानाज्ञा- ना असे ॥ ८३ ॥ कांजळा मोति विये ॥ राखोंडिया दी पूजीये ॥ तरी ज्ञान धर्मु होय ॥ अज्ञानाचा ॥ ८४ ॥ चंद्रमा निगती ज्वाळा ॥ आकाश आते शिळा ॥ तरी

अज्ञान उजळा ॥ ज्ञानातें वमी ॥ ८५ ॥ क्षीराब्धी काळकुट ॥ परी एकी परीचें बिकट ॥ काळकुटीं चोखट ॥ सुधा कैंचि । ८६ ॥ ना ज्ञानी अज्ञान झालें ॥ ते होतांचि अज्ञान गेलें ॥ पुढती ज्ञान एकलें ॥ अज्ञान नाहीं ॥८७॥ ह्मणोनि सूर्य सूर्याचि येव्हडा॥चंद्र चंद्राचि सांगडा ॥ ना दीपाचिया पडिपाडा ॥ ऐसा दीपु ॥८८॥ प्रकाशु तो प्रकाशकीं ॥ यासी न वचे घेइं चुकी ॥ ह्मणोनि जग असिकीं ॥ वस्तु प्रभा ॥ ८९ ॥ विभाति यस्य भासा ॥ सर्वमिदं हा ऐसा ॥ श्रुति कां या वायसा ॥ ढेंकर देती ॥ ९० ॥ या लागीं वस्तु प्रभा ॥ वस्तुचि पावे शोभा ॥ जातसे लाभा ॥ वस्तुचीया ॥ ९१ ॥ वांचूनि वस्तु इया ॥ आपणापें प्रकाशावया ॥ अज्ञान हेतू वायां ॥ अवघेंचि ॥९२॥ ह्मणोनि अज्ञान सद्भावो ॥ कोणें परी न लाहो ॥ ह्मणोनि अज्ञान वावो ॥ पाहों ठेलियाहीं ॥ ९३ ॥ परी तमाचा विमखुरा ॥ न जोडेचि दिनकरा ॥ रात्रीचिया घरां ॥ गेलियाहीं ॥९४॥ कां निद खोळे भरितां ॥ जागणें हि नये हातां ॥ एकलिया टळटळीतां ॥ टाकिजे जेवीं ॥ २९५ ॥ इतिश्री सिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते अज्ञानखंडणं नाम सप्तमप्रकरणं संपूर्णम् ॥ ७ ॥

---

## प्रकरण ८.

श्रीज्ञानेश्वराय नमः ॥ तैसें आमुचेंनि नावें ॥ अज्ञानाचें ज्ञान ही नव्हे॥ आह्मां लागीं गुरु देवें ॥ आह्मीच केलों ॥ १ ॥ परी आह्मा आह्मीं आहो ॥ तें कैसें पाहों जावों ॥ तरी काय कीजे हा ठावो ॥ लाजिजे ऐसा

॥ २ ॥ हा ठावो वर्‍हीं गुरुरायें ॥ नांदविलो उवायें ॥ जे आह्मी न ममाये ॥ आह्मामांजीं ॥ ३ ॥ अहो आत्मपणीं न संटों ॥ स्वसंवितीं न घसवटों ॥ अंगीं लागलें फुटों ॥ कैवल्यहीं ॥ ४ आमुची करवे गोठी ॥ ते जालिच नाहीं वाकपुटी॥आमुतें देखे दिठी ॥ ते दिठीच नव्हे ॥ ५ ॥ आमुतें करूनि विखो ॥ भोगूं शके पारखो ॥ तैं आमुतें न देखों ॥ आह्मीपणा ॥ ६ ॥ प्रकटों लगो न लाहों ॥ येथें नाहीं नवलाहों ॥ परी कैसेन हीं विपावों ॥ असणें याचा ॥ ७ ॥ किंबहुना निवृत्ति ॥ ठविलों असों जये स्थितीं ॥ ते काय देऊं हातीं ॥ वाचेचीया ॥ ८ ॥ तेथें ससोग व्हावया ॥ अज्ञानाचा पाडु कायसा ॥ कउतें मळियां माया ॥ होऊं पाहिजे ॥ ९ ॥ अज्ञानाचा प्रवर्तु ॥ नाहीं जया गांवांआंत॥तेथें ज्ञानाची वर्‍हा मातु ॥ कोण जाणें ॥ १० ॥ रात्रि ह्मणोनि दिवे ॥ पडती की लावावे ॥ वांचूनि सुर्योसवें ॥ मिणणें होय ॥ ११॥ ह्मणोनि अज्ञान नाहीं ॥ तेथेंचि गेलें ज्ञानहीं॥ आतां निमिशोन्मेषा दोहीं ॥ ठेली वाट ॥ १२ ॥ यऱ्हवीं वर्‍हीं ज्ञान अज्ञानें ॥ दोहींचि अभिधानें॥अर्थाचेनि अनानें॥उपलाविलीं॥१३॥जैसीं दंपतें परस्परें ॥तोडूनि पालठिलीं शिरें॥पालटू नाहींपण सरे ॥ दोहींचें जिणें॥१४॥कां पाठीं लाविला होये॥ तो दीपुचि वाधा जाये ॥ दिठी आधारें पाहे ॥ तैं तेचि कृपा॥१५॥ तैसें निपटू नेणिजे ॥ तें ज्ञान शब्दें बोलिजे ॥ आतां सर्व ही जेणें सुजे ॥ तें अज्ञान कैसें ॥१६॥ ऐसें ज्ञानीं अज्ञान आलें ॥ अज्ञानीं ज्ञान गेलें ॥ हें दोन्हीं वांझालें ॥ मिळूनि जालीं ॥ १७ ॥ जाणें तेचि नेणें ॥ नेणं

तोचि जाणें ॥ आतां कें असणें ॥ ज्ञानाज्ञाना ॥ १८॥ एवं ज्ञानाज्ञान दोन्हीं ॥ इये पोटीं सूनि अहाणी ॥ उदेला चिद्गगनीं॥चिदादित्यु हा॥१९॥इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते ज्ञानखंडणंनाम अष्टमप्रकरणं संपूर्णं॥८॥

---

## प्रकरण ९.

श्रीनिवृत्तिनाथाय नमः ॥ आतां आमोद सुनाम जालें ॥ शृति श्रवण निघालें ॥ आरिसे उठिले लोचनेसीं ॥ १ ॥ आपुलेनि समीरपणें ॥ वेल्हावती विंजणें ॥ कीं माथेंचि चांपेपणें॥बहकताती॥२॥जिव्हा लोधली रसें॥ कमळ सूर्यपणें विकसे॥चकोरेंचि जैसें॥चंद्रमा जालीं ॥३॥ फुलेंचि झालीं भ्रमर ॥ तरुणीच जाले नर ॥ जाले आपुले सेजार ॥ निद्राळुचि ॥४॥ दिठीचिया बरवा ॥ नाना रूपाचीया ठेवा ॥ घडिला कां कोरिवा ॥ परी जैसा ॥ ५ ॥ तैसें भोग्य आणि भोक्ता ॥ दिसे आणि देखता ॥ हें सरलें अद्वैता ॥ अफुटा माजीं ॥ ६ ॥ सेंवतेपणा बाहेरी ॥ न निवताचि परी ॥ पाती सहस्त्र वरी॥ उपलविजे ॥ ७ ॥ तैसें नाना अनुभवीं ॥ वाजतां वाधावी ॥ अक्रियेच्या गांवीं ॥ नेणिजे तें ॥ ८ ॥ ह्मणोनि विषयाचेंनि नांवें ॥ मुनीं इंद्रियांचे थवे ॥ सैंघ घेती धावें ॥ समोरहीं ॥ ९ ॥ परी आरिसा सिवे सिवें ॥ तवं दिठीसी दिठी फावे ॥ तैसें जालें धांवें ॥ वृत्तिचीया ॥ १० ॥ नाग मुदि कंकण ॥ त्रिलिंगीं भेदली खूण ॥ घेतां तरी सुवर्ण ॥ घेइजे कीं ॥ ११ ॥ वेंचूनि आणू कल्लोळ ॥ ह्मणोनि घापे करतळ ॥ तेथें तरी निखळ ॥ पाणीच फांके ॥ १२ ॥ हातापासीं स्पर्शु ॥ डोळ्यापा-

सीं रूपसु ॥ जिभेपासीं मिठांशु ॥ कोण्हीं येका॥१३॥ तर्‍हीं पग्मिळा परौतें ॥ देखणें नाहीं कापुरातें ॥ तैसें बहुतां परी स्फुरतें ॥ तेंचि स्फुरे ॥ १४ ॥ ह्मणोनि शब्दादि पदार्थ ॥ श्रोत्रादिकाचे हातें॥ घ्यावया जेथें ॥ उजू होतीं ॥ १५ ॥ तेथें संमंधु होय न होयें ॥ तंव इंद्रियांचे ते नोहें ॥ मग अमतांचि आहे ॥ समंधुना ॥ १६ ॥ जिये पेरी दिसती उर्मी ॥ तियें लाभती कीं रसीं ॥ कां कळा निवडती शशी ॥ पुनिवेचीया ॥१७॥ पडिलें चांदावरी चांदणें ॥ समुद्रीं जालें वरखयें ॥ विषया कारणें ॥ भेटती तैसी ॥ १८ ॥ ह्मणोनि तोंडांआड पडे ॥ तेव्हा वाचा वावडे ॥ परी समाधी न मोडे ॥ मौन मुद्रेची ॥१९॥ व्यापाराचे गाडे ॥ मोडतां ही अपाडे ॥ अक्रियेच मोडे ॥ पाउल केंहीं ॥ २० ॥ पसरू निवृत्तिचीं वांवें ॥ दिठी रूपातें देखवें ॥ परी साचाचेंनि नांवें ॥ कांहीं च न लागे ॥ २१ ॥ तमातें घ्यावया ॥ उचलूनि सहस्त्र बाहिया ॥ सेवटीं रवि यया ॥ हाचि जैसा ॥ २२ ॥ स्वप्निचीया विलासा ॥ भेटईन या आशा ॥ उठिला तंव जैसा ॥ तोचि मातो ॥ २३ ॥ तैसा उदैलियानि विषयें ॥ ज्ञानी विषयीं हो लाहे ॥ तव दोन्हीं नहोनि होये ॥ काय नेणों ॥ २४ ॥ चंद्र वेचूं गेला चांदिणें ॥ तव वेचिलें काय कोणें ॥ विऊनि वांझे स्मरणें ॥ होती जैसी ॥ २५ ॥ प्रत्यहारादि अंगीं ॥ योगें अंग टेकिलें योगी ॥ तो जाला ये मार्गीं ॥ दिहाचा चांदु ॥ २६ ॥ येथें प्रवृत्ति वाढे जिणें ॥ अप्रवृत्तिसी वाधावणें ॥ आतां प्रत्यङ्मुखपणें ॥ प्रचारु दिसे ॥ २७ ॥ द्वैत दशेचें आंगण ॥ अद्वैत वोळगे आप-

ण ॥ भेदु तंव तंव दुणें ॥ अभेदासी ॥ २८ ॥ कैवल्या
ही चढावा ॥ करित विषय सेवा ॥ जाला भृत्यु भज्य
कालोवा ॥ भक्तिचा घरीं ॥ २९ ॥ घरा माजीं पाये ॥
चालतां मार्गु ही तोचि होये ॥ ना बैसें तऱ्हीं आहे ॥
पावणेंचि ॥ ३० ॥ तैसें भलतें करितां ॥ येथें पाविजे
कांहीं आतां ॥ ऐसेंन हीं न करितां ॥ ठाकीजेना
॥ ३१ ॥ आठव आणि विसरु ॥ तयातें ही घेऊ नेदी
पसरु ॥ दशेचा व्यवहारु ॥ असाधारणु ॥ ३२ ॥ जा-
ली स्वेछाचि विधि ॥ स्वैर जाली समाधी ॥ दशेंहीये
मोक्ष रिद्धि ॥ बैसो घापे ॥ ३३ ॥ जाला देवोचि भक्तु ॥ ठा-
वोचि जाला पंथु ॥ होऊनि ठेला येकांतु ॥ विश्वचि हें
॥ ३४ ॥ भलतेउते न देवे ॥ भलतेन भक्त होआवें ॥
बैसला तेथें राणिवे ॥ अकर्मू हें ॥ ३५ ॥ देवाचीया दा-
टणी ॥ देउळा जाली आटणी ॥ देश काळादि वाहा-
णी ॥ येइचिना ॥ ३६ ॥ देवीं देवोचि नमाये ॥ मा दे-
वीकें अन्वयो आहे ॥ तेथें परीवारु बहुयें ॥ अघडता
कीं ॥ ३७ ॥ ऐसाही स्वामी भृत्यु संमंधा ॥ लागि उ-
ठति श्रद्धा ॥ तै देवोचि नुसधा ॥ कामविजे ॥ ३८ ॥
अवघियाची उपचारा ॥ जप ध्यान निर्धारा ॥ नाहीं
आन संसारा ॥ देवें वांचूनि ॥ ३९ ॥ आतां सेवा तेचि
देवें ॥ देववरी भजावें ॥ अर्पणाचेनि नांवें ॥ भलतिया
॥ ४० ॥ देव देउळ परीवारु ॥ कीजे कोरूनि डोंग-
रु ॥ तैसा भक्तिचा वेव्हारु ॥ कां न व्हावा ॥ ४१ ॥
अहो मुर्गी मुगा जैसें ॥ घेतां न घेतां नवल नसे ॥ केलें
देवपण तैसें ॥ दोहीं परीं ॥ ४२ ॥ अखताचि देवता ॥
अखताचि असे न पुजितां ॥ मां आखतीं काय आतां ॥

पृजों जावें ॥ ४३ ॥ दीप्तिचीं लुगडीं ॥ दीपकळी केतू वढि ॥ हे न ह्मणतां ते उघडी ॥ ठाके काई ॥ ४४ ॥ कां चंद्रातें चंद्रिका ॥ न ह्मणिजे तें लोकां ॥ तऱ्हीं ता असिका ॥ तियाचि कि ना ॥४५॥ आगीपणें आगी ॥ असताचि असे अंगीं ॥ मा कासया लागी ॥ देणें न देणें ॥ ४६ ॥ ह्मणोनि भजतां भजावें ॥ मा न भजतां काय नव्हें ॥ ऐसें नाहीं स्वभावें ॥ श्री शिवाचि असे ॥ ४७ ॥ आतां भक्ति अभक्ति ॥ जालें ताट एकीं पांतीं ॥ कर्माकर्माचीया वाति ॥ माल्हाऊनियां ॥४८ ॥ ह्मणऊनि उपनिषदें ॥ दशे येति निंदें ॥ निंदाचि विशदें ॥ स्तोत्रें होतीं ॥ ४९ ॥ नातरी निंदा स्तुती ॥ दोन्ही मौनासाठीं जाती ॥ मौनीं मौन आथी ॥ न बोलतां बोलीं ॥ ५० ॥ घालितां अंव्हा सव्हां पायें ॥ शिव यात्रा होत जाये ॥ शिवा गेलियाही नोहे ॥ केही जाणें ॥ ५१ ॥ चालणें आणि बैसक ॥ दोन्हीं मिळोनि ऐक ॥ नोहे ऐसें कौतुक ॥ इये ठाइं ॥ ५२ ॥ येऱ्हवीं आडाळिलिया डोळां ॥ शिवयात्रेचा सोहळा ॥ भोगिजे भलतेव्हेळा ॥ भले तेणे ॥ ५३ ॥ ना समोर दिसे शिवही ॥ परी देखिसें कांहीं नाहीं ॥ देवभक्ता दोहीं ॥ एकचि पाडु ॥ ५४ ॥ आपणचि चेंडु सुटे ॥ मग आपणयां उपटे ॥ तेणें उदळला दाटे ॥ आपणपांचि ॥ ५५ ॥ ऐसी जरी चेंडुफळी ॥ देखिजे कां केव्हेळीं ॥ तरी बोलिजे सरळीं ॥ प्रबुद्धाची ॥ ५६ ॥ कर्माचा हात न लगे ॥ ज्ञानाचेंही कांहीं न रिगे ॥ ऐसीच होतसे आंगें॥ उपास्ति हे ॥ ५७ ॥ निफजेना निमे ॥ अंगें अंग भुमें ॥ सुख सुखा उपनमें ॥ देखविलें इया ॥ ५८ ॥ को

ऱ्हीं एक अक्रित्रिम ॥ भक्तिचें हें वर्म ॥ योग ज्ञानादि विश्राम ॥ भूमिका हे ॥ ५९ ॥ अंगी केर एक जालें॥ परी नाम रूपाचे मासले ॥ होते तेही आटले ॥ हरि-हर येथें ॥ ६० ॥ अहो अर्धनारीनटेश्वरें ॥ गिळीत गिळीत परस्परें ॥ ग्रहण जालं एकसरें ॥ सर्व ग्रासें ॥ ६१ ॥ वाच्य जाता खाऊनि ॥ वाचकत्वही गिळूनि॥ ठाकली निर्देजौनि ॥ परा येथें ॥ ६२ ॥ शिवाशिवा समर्था स्वामी ॥ येव्हडिये आनंद भूमि ॥ घेपें दिजे एकें आह्मीं ॥ ऐसें केलें ॥ ६३ ॥ चेताचि मा चेवविलें ॥ निदैलेंचि मां निदविलें ॥ आह्मीच आह्मां आणिलें ॥ नवल जी तुझें ॥ ६४ ॥ आह्मी निखळ मातुझें ॥ वरी लोभें ह्मणसी माझें ॥ हें पुनरुक्त साजे ॥ तूंचि ह्मणोनि ॥ ६५ ॥ कोण्हांचें कांहीं नेघसी ॥ आपुलं हीं तैसाचि नेदासि ॥ कोण जाणें भोगसी ॥ गौरव कैसें ॥ ६६ ॥ गुरुत्वें जेव्हडा चांगु ॥ जेव्हडाचि तारूनि-लघु ॥गुरु लघु जाणें जो पांगु ॥ तुझा करी ॥ ६७ ॥ शिष्या देतां वाटें ॥ अद्वैताचा समो फुटे ॥ तरी काह्या होती भाटें ॥ शास्त्रे तुझीं ॥ ६८ ॥ किंबहु ये दातारा ॥ मी तूं याचा संसारा ॥ वेचूनि होसी सोयरा ॥ तेणेंचि तूं तोषे ॥ ६९ ॥ इति श्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते जीवन्मुक्तदशाकथनं नाम नवमप्रकरणं संपूर्णम् ॥

---

## प्रकरण १०.

श्रीज्ञानदेवाय नमः ॥ परीगा श्रीनिवृत्ति राया ॥ हातातळीं सुख दिधलें तुयां ॥ परी निवांतचि मियां॥ भोगावे कीं तें ॥ १ ॥ परी महेशें सूर्या हातीं ॥ दि-

घली तेजाचीं सुति ॥ तया भासा अंतर्वर्ति ॥ जगींचि केलें ॥ २ ॥ चंद्रासी अमृत घातलें ॥ तें तयाचि का इयेतुले ॥ कीं सिंधु मेघा दिधलें ॥ मेघाचि भागु ॥३॥ दिवां जो उजिवडु ॥ तो घरांचाची सुरवाडु ॥ गगनीं आथी पवाडु ॥ जगाचाची कीं ॥ ४ ॥ अगाधेंही उचंबळती ॥ ते चंद्रीची ना शक्ती ॥ वसंत करी तैं होती ॥ झाडाचे दानीं ॥ ५ ॥ ह्मणोनि हें असंवर्य ॥ हें दैवकेंचें औदार्य ॥ वांचूनि स्वांततर्य ॥ माझें नाहीं ॥ ६ ॥ आणि हा येव्हडा ऐसा ॥ परीहार देऊं कायसा ॥ प्रभू प्रभाव विन्यासा ॥ आड ठाऊनि ॥७॥ आह्मी बोलिलों जें जें कांहीं ॥ ते प्रगटेंचि असे ठाईं ॥ मा स्वयंप्रकाशा काई ॥ प्रकाशावें बोलें ॥ ८ ॥ नाना विषायें आह्मीं हन ॥ कीजे तें पां मौन ॥ तरी काय जनाजन ॥ दिसते ना ॥ ९ ॥ जनातें जनांत देखतां ॥ दृष्टेंचि दृष्ट तत्वतां ॥ कोण्ही नहोनि आइता ॥ सिद्धांतचि हा ॥ १० ॥ यया परौतें कांहीं ॥ सच्चिद्रहस्य नाहीं ॥ आणि हें तया अर्थी हीं ॥ अमतचि असे ॥ ११ ॥ तऱ्हीं ग्रंथ प्रस्तावो ॥ न घडे हें ह्मणों पावों ॥ तरी सिद्धानुवाद लाहो ॥ आवडी करूं ॥ १२ ॥ पढियंतें सदां तेंचि ॥ परी भोगीं नवी नवी रूची ॥ ह्मणोनि हा उचितचि ॥ अनुवाद सिद्ध ॥ १३ ॥ या कारणें मीया ॥ गोप्य दाविलें बोलोनियां ॥ ऐसें नाहीं आपैसया ॥ प्रकाशाचि ॥ १४ ॥ आणि पूर्णाहंता वेठलों ॥ सैघ आह्मींच दाटलों ॥ मा लोपलों ना प्रगटलों ॥ कोण्हां होउनि ॥१५॥ आपणया आपणपें ॥ निरोपण काय बोपे ॥ मा उगेपण हारपे ॥ ऐसें आहे ॥१६॥ ह्मणोनि मा-

ग्नि वैखरी ॥ मौनाचे ही मौन करी॥ हे पाणिया व (*) करी ॥ रेखिलिया ॥ १७॥ एवं दशोपनिषदें ॥ पुढारी न ढळती पदें ॥ देखोनि बुडि बोधें ॥ येथांचे दिधली ॥ १८ ॥ ज्ञानदेव ह्मणे श्रीमंत ॥ हें अनुभवामृत ॥ सेऊनि जीवन्मुक्त ॥ हेचि हेतु ॥ १९ ॥ मुक्ति कीर वेव्हाळ॥अनुभवामृत निखिळ॥परी अमृता हीं उठी लाळ॥ अमृतें येणें ॥ २० ॥ निशीं चांदु होये ॥ परी पुनिव आनु आहे ॥ हें कांमी ह्मणों लाहें ॥ सूर्य दिठीं ॥२१॥ प्रिया सावाइलें होये ॥ तें अंगीचे अंगीं न समाये ॥ येऱ्हवीं तेथेंचि आहे ॥ तारुण्य कीं ॥ २२ ॥ वसंताचा आला ॥ फळीं फुलीं आपुला ॥ गगानाचीया डाळा ॥ पलती झाडें ॥ २३ ॥ यया लागीं हें बोलणें ॥ अनुभवामृतपणें ॥ स्वानुभूति परी गुगें ॥ वोगरिलें ॥ २४ ॥ आणि मुक्तमुमुक्षबद्धे ॥ हे तव वरी योग्यता भेदें ॥ अनुभवामृत स्वादें ॥ विरुद्धें जंव ॥ २५ ॥ गंगावगहना आलीं ॥ पाणियें गंगा जाली ॥ कां तिमिरें भेटलीं ॥ सूर्या जैसीं ॥ २६ ॥ नांही परिसाची कसवटी ॥ तवं वरीचवानियाच्या गोष्टी ॥ मग पंधरावयाच्या पाठीं ॥ बैसावें कीं ॥ २७ ॥ तैसें जे या अक्षरां ॥ भेटती गाभारां ॥ ते वोघ जैसे सागरां ॥ आंतु आले ॥ २८ ॥ जैस्या आकारादि अक्षरा ॥ भेटती पन्नासविमात्रा ॥ तैसें यां चराचरां ॥ दुसरे नाहीं ॥ २९ ॥ तैसें तिये ईश्वरीं ॥ आंगोळी नुभेचि दुसरी ॥ किंबहुना सरोभरी ॥ श्रीशिवेंसींचि ॥ ३० ॥ ह्मणोनि ज्ञानदेवो ह्मणे ॥ अनुभवामृतें येणें ॥ सणु भोगिजे सणें॥विश्वाचेनि॥३१॥इतिश्रीसिद्धानुवादे श्रीमदनुभवामृते ग्रंथमहिमासवर्णनं नाम दशमप्रकरणं संपूर्णम्॥